



नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)





महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई - ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन



अनुक्रमणिका









चाळीस वर्षांनंतर
**चार ओळीं** ना समर्पित
अकरा शब्दांनी घडवलेली
ही एक कविता

तीस वर्षीय
**तीन ओळीं** चा
प्रबंध

वीस वर्षांत अनुभवलेल्या
**दोन ओळी**

दहा वर्ष लांब **ओळ**

एक वर्षी **शब्द**

महिन्याभरात अर्धाएक **अक्षर**

दिवसाकाठी एकादाच **बिंदु**

खोलवर मनात
रुतलेला
सौंदर्यात न्हालेला

त्याचाच शोध

जीवित कार्य / र कृ जोशी

**मराठी अभ्यास परिषद पत्रिका**
# भाषा आणि जीवन
**वर्ष १६ : अंक १ हिवाळा १९९८**






# अनुक्रम



---


- प्रकाशन : त्रैमासिक (जानेवारी, एप्रिल, जुलै, ऑक्टोबर)
- संपादन - समिती : विजया देव (प्रमुख), अशोक रा. केळकर, अंजली सोमण, द. दि. पुंडे, प्र. ना. परांजपे, मॅक्सीन बर्न्सन, आशा मुंडले, मृणालिनी शहा, गं. ना. जोगळेकर, नीलिमा गुंडी
- संपादकीय संपर्क व परीक्षणार्थ पुस्तक : विजया देव, सुप्रिया, ६१/१४ एरंडवन, पुणे ४११००४ दूरध्वनी : ३६८६९३
- व्यवस्थापकीय संपर्क व पैशांचा भरणा : मृणालिनी शहा, १ शीतल अपार्टमेंटस्, ४६/४ एरंडवन, पुणे ४११००४ दूरध्वनी : ३३३८६९
- पत्रिकेची वर्गणी, परिषदेची वर्गणी, जाहिरातीचे दर : आवरण पृष्ठ तीन पहा.
- सूचना : पत्रिकेत प्रसिद्ध होणाऱ्या लेखांच्या/ लेखकांच्या मतांशी संपादक किंवा परिषद सहमत असतीलच, असे नाही.
- या अंकाच्या प्रकाशनासाठी महाराष्ट्र राज्य साहित्य संस्कृति मंडळाचे अंशतः अनुदान मिळालेले आहे. तथापि या नियतकालिकातील लेखकांच्या विचारांशी मंडळ व राज्यशासन सहमत असेलच असे नाही.
- संपादक : विजया देव, प्रकाशक व मुद्रक : मराठी अभ्यास परिषदेसाठी मृणालिनी शहा
- मुद्रण स्थळ : सिध्दी एन्टरप्रायजेस, 'मोहोर', आसावरी सोसायटी, पुणे ४११०२९

# गोष्ट सांगू म्हणता ?

**विजया देव**

गोष्टी ऐकायला आपण सगळेच उत्सुक असतो. लहान मुलं तर विशेषच. एरवी एवढ्यातेवढ्यावरून हटून बसणारी, जेवायला खळखळ करणारी मुलं देखील गोष्ट म्हटली की गोष्ट सांगणाऱ्याभोवती कोंडाळं करून, डोळे विस्फारून, एकमेकांना खेटून गोष्ट ऐकायला सज्जच होतात. आणि अशा लहान मुलांना रोज तऱ्हेतऱ्हेच्या, नवनवीन गोष्टी सांगायला आता आतापर्यंत घरातलं कोणीतरी मोठं माणूस- आई, आजी, वडील, मोठं भावंड - हजर असेच. राजाराण्यांच्या, भुताखेतांच्या, पुराणातल्या गोष्टी, कहाण्या असा खजिना रिता होत असे. गोष्टी ऐकण्याची सनातन हौस कायम असली तरी ह्या गोष्टी-वेल्हाळांना मात्र सध्या ओहोटी लागलेली दिसते. आताच्या गोष्टी सांगणाऱ्या आई, वडील, आजी, आजोबा इत्यादी मंडळींची भिस्त थेट गोष्टींच्या पुस्तकावरच असते. ''रोज कुठली रे गोष्ट सांगायची? मला नाही आठवत गोष्ट बिष्टं ...'' अशी सुरुवात करून मग कुठली तरी गोष्ट आठवायची, त्यात मुलांचा कल पाहून बदल करायचे, रागरंग पाहून पाल्हाळ लावायचा किंवा आटोपतं घ्यायचं हा माहौल जाऊन आता सर्रास पुस्तकातली गोष्ट वाचून दाखवली जाते.

वास्तविक गोष्ट सांगितली काय किंवा ती वाचून दाखवली काय, गोष्ट ही गोष्टच असते. मुलांशी संवाद साधायचं ते एक माध्यम आहे हे लक्षात घेतलं तर गोष्ट वाचून दाखवतानाही त्यात रंग भरता येतो. गोष्टीशी आणि मुलांशी जवळीक साधली तर गोष्ट स्मृतीच्या खजिन्यातली की पुस्तकातली हा मुद्दा गौण असतो. मुलांच्या मनात गोष्ट साकार होणं महत्त्वाचं. त्यासाठी गोष्ट वाचून दाखवणाऱ्याचे हावभाव, आवाजातील चढउतार, तन्मयता, अभिनय, क्वचित स्वत:ची भर घालणं हे सगळं अभिप्रेत असतं.

पण प्रत्यक्षात आपल्याला बहुतेक वेळा दिसतो तो एक कर्तव्यापोटी केलेला व्यवहार. वाचणारी व्यक्ती -वडील किंवा अन्य कोणी पुस्तक मोठ्यानं वाचतेय आणि मूल अंथरुणावर आरामशीर लोळतंय असंच चित्र कित्येकदा दिसतं. गोष्ट सांगणाऱ्याच्या दृष्टीनं जणू काही ते झोपण्यापूर्वीचं एक शेवटचं काम असतं आणि ऐकणाऱ्याची नुसती श्रवणभक्ती. गोष्टीच्या पुस्तकाला, गोष्ट सांगण्याच्या व्यवहाराला मिळतं एका निर्जीव वस्तूचं (क्रयवस्तूचं ?) स्थान.

गोष्ट वाचून दाखवणं आपल्याकडे आलं पाश्चात्त्य देशांमधून. तिकडे हे चित्र वेगळं असतं. गोष्ट वाचून दाखवणारा पुस्तक उघडून बसतो. ऐकणारं मूल लहान असलं, त्याला अक्षर ओळख नसली तरी तेही त्या पुस्तकात डोकं खुपसतं. गोष्ट सांगणारा, पुस्तकाचं उघडलेलं पान यांच्याशी त्याची सलगी, जवळीक असते. गोष्टीच्या पानावरची अक्षरं, चित्रं, रंग, त्या पानाचा पोत आणि वाचणाऱ्याचा आवाज या सगळ्याशी ते मूल एकरूप होतं, त्या गोष्टीचाच भाग बनतं. मौखिक वाङ्मयाची उणीव अक्षर वाङ्मय भरून काढतं.

गोष्ट ऐकवणं, गोष्टीचा प्रत्यय देता येणं ही खरोखरच कौशल्याची बाब आहे. गोष्ट ऐकवताना पुस्तकातील पाठ्याचा आधार घेऊन खरं म्हणजे एक नाट्यानुभवच सादर करावा लागतो. कथानक, गोष्टीतली पात्रं, त्यांचे स्वभाव, घडामोडी, वातावरण यांना अनुरूप अशा हालचाली सुद्धा कुशलं गोष्ट सांगणारा करतो. त्यामुळे पुस्तकातली गोष्ट हा मुलाच्या दृष्टीनं एक प्रत्ययकारी, जिवंत अनुभव बनतो. मात्र असा अनुभव देणारे फार कमी अशा पद्धतीनं गोष्ट सांगणारे आणि सरधापटेपणे सांगणारे यांच्यातला फरक मुलांना ताबडतोब कळतो आणि त्याची जाहीर वाच्यता करायला ती मुळीच मागे पुढे पाहात नाहीत. मुलांच्या कानावर पडणारे, त्यांच्या अनुभवाला येणारे सर्व प्रकारचे भाषिक/ गैर भाषिक संवाद हा खरं तर त्यांच्या भाषासंपादनाचा पायाच असतो. गोष्ट सांगणं ऐकवणं हे एक निमित्त त्यामुळे हा दुवा कच्चा राहणार नाही याची खबरदारी आपण मोठ्यांनी घेतली पाहिजे. आपल्याकडेही अशा पद्धतीनं पुस्तकातून गोष्टी सांगणारे सन्माननीय अपवाद आहेत. दोन्ही पद्धतींनी गोष्ट 'अनुभवण्या'चा फायदा मला माझ्या आईवडलांकडून मिळाला. कहाण्या, गोष्टी आई 'सांगे ' आणि इंग्रजी-अमेरिकन पुस्तकं मिळवून वडील गोष्टी 'ऐकवत.'. दोन्हीत तन्मयता मात्र एकाच प्रकारची होती.

गोष्टी सांगितली काय की ऐकवली काय, दोन्हीचा गाभा एकच आहे. समरसतेतून येणारा वाचिक अभिनय, गोष्टीतल्या घडामोडींशी सुसंगत हावभाव यातून गोष्ट उभी राहते. कथानकापासून कोरडं राहून, दूर राहून गोष्ट सांगता येत नाही की ऐकताही येत नाही. गोष्ट ऐकायची म्हणजे आयती करमणूक मिळवायची असं नसतं. आपणही त्या गोष्टीचा भाग व्हावं लागतं. पुस्तकातली गोष्ट वाचून सांगणारा आणि ती ऐकणारा यांच्यातलं अंतर गोष्ट मिटवून टाकत असतं. ही कला सर्वांनाच जमते

असं नाही. गोष्ट खुलवून सांगणं ही हातोटी प्रत्येकालाच कशी असणार? कुठे यात आई जास्त वाकबगार असते तर कुठे वडील. या दोघांमधला फरक मुलं मात्र बरोबर ओळखून असतात. कोणाकडून गोष्ट ऐकायची याचा निर्णय ते करतात किंवा तेही मुलांच्या हातात राहिलं नाही तर....




गोष्ट म्हटली की लहान-थोर सारखेच रमतात. मग कोणी ती सांगो ऐकवो की आपली आपण ती वाचायची असो. संवादाचं रुपच ते. या हास्यचित्रातही एवढा मोठा आशय सामावलेला आहेच. माणसा माणसातील संवादाची अशी अनेक रुपं या अंकात वाचायला मिळतील.

*(वरील हास्यचित्र दैनिक सकाळ मधून घेतलेले आहे. ते छापायला अनुमती दिल्याबद्दल श्री प्रभाकर वाडेकर व श्री चारुहास पंडित यांचे आभार)*

□□□

**सुप्रिया, ६१/१४ एरंडवन**
**प्राप्तिकर सदनाजवळ, पुणे-४११००४**





अनुक्रमणिका

# कर्णबधिरांची भाषा आणि शिक्षण

जयश्री जोग

'मूकबधिर' ह्या प्रचलित शब्दाऐवजी 'कर्णबधिर' हा शब्द अलीकडे शासन-मान्य झाला आहे. जसा 'अपंग' हा शब्द जाऊन त्याऐवजी 'विशेष गरजा' असलेले मूल हा शब्द अस्तित्वात आला. कर्णबधिरत्व हे दुहेरी व्यंग आहे. म्हणजे केवळ ऐकू न येण्याने ही मुलं तुमच्या-आमच्यासारखी बोलू शकत नाहीत. तुमच्या आमच्यासारखी हा शब्द मुद्दामच वापरला. ती बोलू शकतात, संवाद साधू शकतात. त्यांचं व्यंग हे ऐकू न येण्यापुरतंच मर्यादित आहे. ही मुलं मुकी नाहीत. निदान ती तशी असू नयेत / राहू नयेत असा आशावाद कर्णबधिर ह्या शब्दातून प्रतीत होतो.

कर्णबधिरत्व हे जसं दुहेरी व्यंग आहे. तसंच ते न दिसणारं व्यंगही आहे. ह्या व्यक्तीला ऐकू येत नाही हे केवळ तिच्याकडे बघून आपण छातीठोकपणे सांगू शकत नाही.

कर्णबधिर मूल म्हटल्यावर 'अरेरे! बिच्चाऱ्याला ऐकू येत नाही.' अशी आपली प्रतिक्रिया असते. त्यांच्यावर दया दाखवून त्याला आपण 'बिच्चारा' ठरवतो आणि त्याला विसरूनही जातो. त्याचा विचारही नंतर आपल्या मनात डोकवत नाही.

पण ही दयाळू वृत्ती त्याला नको आहे. श्रवण यंत्र लावलेलं पाहिल्यावर वळून वळून पाहणाऱ्या, त्यांची कीव करणाऱ्या नजरा त्याला नको आहेत. चष्मा लावलेल्या मुलात आपल्याला काही वैचित्र्य आढळत नाही. मग श्रवण यंत्र लावलेल्या मुलाकडे आपण असे का बघतो? श्रवण यंत्राला अजून समाजमान्यता मिळालेली नाही. ह्या गोष्टीचा त्या मुलाच्या मनावर नक्कीच परिणाम होतो. अहो, साधी गोष्ट आहे. दोन व्यक्तींनी बोलताना चुकून जरी आपल्याकडे पाहिलं, तरी आपण किती अस्वस्थ होतो. मग इथे तर एका बाजूला कर्णबधिर मूल एकटं असतं आणि दुसऱ्या बाजूला सगळा समाज असतो. प्रत्येकजण त्याच्याकडे असाच बघत असतो आणि बघता बघता काहीतरी कुजबुजत असतो. आपण काहीतरी वेगळे आहोत, ह्या समाजापासून वेगळे आहोत; हा समाज आपल्यासाठी नाही असा न्यूनगंड

त्याच्यात इथपासूनच जोपासला जातो. तो समाजापासून त्यामुळे अधिकच दूर जाऊ लागतो. त्याला समाजाची अशी गरज लागतच नाही. तो आपल्याच वर्तुळात सुखी असतो. गरज असते आपल्याला, त्याला आपल्यात आणण्याची आणि अडचण येते आपल्यालाच त्याच्याशी संवाद साधायची.

कर्णबधिरत्व म्हणजे नेमकं काय ते आपल्याला नक्की माहीत नसणे हे एक कारण यामागे असू शकते. कर्णबधिरत्व म्हणजे नेमकं काय, त्यामुळे त्यांना कोणत्या अडचणी येतात, त्यांचं शिक्षण, भाषाविकास, वाचाविकास कसा होतो. त्यांच्या पुनर्वसनासाठी, सामाजिकीकरणासाठी काय प्रयत्न होत आहेत त्याविषयी ही थोडक्यात माहिती.

कर्णबधिरत्व म्हणजे ऐकू न येणं. ऐकू का येत नाही या प्रश्नाचं सगळ्यांत प्रचलित उत्तर म्हणजे 'माहीत नाही.' हे व्यंग नेमकं कशामुळे येतं ते आपण सांगू शकत नाही. वैद्यकीय शास्त्राच्या आधारे कर्णबधिरत्वाबाबत पुढील काही कारण असू शकतात- आनुवांशिकता, गर्भावस्थेतील पहिल्या तीन महिन्यांत आईला काही त्रास होणे, (उदा. पोटाला मार लागणं, काही विशिष्ट प्रतिजैविकं(Antibiotics) घेणं, काही संसर्गजन्य रोग होणं इ.) प्रसूतीच्या वेळी आईला काही त्रास होणं उदा. प्रमाणाबाहेर रक्तस्राव होणं, चिमटे लावून प्रसूती करायला लागणं, प्रसूतीला प्रमाणाबाहेर जास्त वेळ लागणं, इ.) मूल अपुऱ्या दिवसांचं जन्माला येणं, प्रसूतीनंतर ल लगेच न रडणं (मूल लगेच रडलं नाही तर मेंदूला प्राणवायूचा पुरवठा होत नाही. त्यामुळे मेंदूतील पेशी मरू लागतात.) जन्मानंतर बाळाला काही आजार होणे (मोठ्या प्रमाणात कावीळ, खूप ताप येऊन तापात फीट्स येणे, बाळाच्या डोक्यावर आघात होणे, इ.)

कर्णबधिरत्व लवकर लक्षात येणं आणि त्यानुसार प्रशिक्षण सुरू करणं हे सगळ्यांत महत्त्वाचं. कारण भाषा आत्मसात करण्यासाठी मुलाचा मेंदू वय वर्षे १ ते ३ यांमध्ये सगळ्यांत जास्त संवेदनक्षम आणि कार्यक्षम असतो. त्यामुळे जितक्या लहान वयात त्याला भाषेची ओळख होईल तेवढं चांगलं.

श्रवण दोष पाहण्यासाठी ❊ नादकाटा चाचणी **(Rinne Test)** ❊ शुद्ध ध्वनी चाचणी **(Pure Tone Audiometry)**, ❊ इम्पीडन्स **(Impedence)** ❊ बेरा चाचणी **(BERA - Brain Steam Evoked Response Audiometry)**





अनुक्रमणिका

इ. चाचण्या आहेत.(*लेखाच्या शेवटी याविषयी माहिती आहे.)

सहा महिन्यांच्या मुलाचीही बेरा चाचणी करता येऊ शकते. शुद्ध ध्वनि चाचणी करून श्रवण दोष किती आहे आणि कुठे आहे हे कळू शकतं. दोष जर मध्यकर्णात, ध्वनीच्या वहनात असेल (संवहनी श्रवण दोष. Conductive Hearing Loss) तर तो पूर्णपणे बरा होऊ शकतो. मात्र दोष जर अंतःकर्णात- जिथे ऐकण्याच काम प्रत्यक्षात घडतं तिथे असेल (संवेदनी श्रवण दोष-Sensory Neural Hearing Loss), तर तो मात्र बरा होऊ शकत नाही.




आपल्याच मुलाच्या बाबतीत हे असं का? विचार करकरूनही ह्याचं उत्तर पालकांना सापडत नाही. एक उदासीनतेची भावना त्यांच्यात दिसून येते. पालकांचा (आई आणि वडलांचा दोघांचाही सारखाच) त्या मुलाच्या सामाजिकीकरणात, भाषा विकासात, पुनर्वसनात महत्त्वाचा वाटा असतो. पण बहुतांशी घरात तो मुलगा दुर्लक्षित राहतो. त्याला कसं बोलतं करावं तेच पालकांना उमजत नाही. मूल त्याला जमेल तशा खुणा करून, हातवारे करून आपल्या गरजा बोलत असतं.





अनुक्रमणिका

सवयीने घरच्यांना त्याचं बोलणं कळतं एवढंच.

आवाजाची ओळख या मुलांना कृत्रिमरीत्या करून द्यावी लागते. त्यासाठी श्रवण यंत्र काही प्रमाणात उपयोगी पडतं. श्रवणयंत्र हे आवाज मोठा करून सांगण्याचं एक साधन आहे. चेहऱ्यावर हास्य ठेवून आपण मोठ्यांदा बोलू शकत नाही. आपले व वातावरणातील इतर आवाज श्रवण यंत्र मोठे करत असतं. यंत्र लावून कुकरच्या शिट्टीचा, टेलिफोन बेलचा, घंटीचा इ. आवाज येत आहेत, ते ऐक असं सांगून त्याला आवाजाची, आवाजाकडे लक्ष देण्याची सवय लावावी लागते. हळूहळू आईचा आवाज, बाबांचा आवाज वेगळा, शाळेतल्या बाईंचा आवाज वेगळा इथपासून अर्थपूर्ण शब्दांचं आकलन होण्यापर्यंतचा हा प्रवास घडवून आणावा लागतो. श्रवण यंत्र लावल्यावर लगेच ऐकू येईल किंवा मूल बोलू लागेल अशी इतरांची अपेक्षा असते.

राजूला श्रवण यंत्र आणलं. बसवलं. बॅटरी वगैरे व्यवस्थित घातली. यंत्र चालू केलं आणि राजूला सगळे हाका मारू लागले. पण राजू लक्षच देईना. ह्यातून त्याला ऐकू येतंय ना? यंत्र चालू आहे ना? अशी शंका येणंही साहजिकच आहे. बॅटरीसुद्धा बदलून झाली. मग 'राजू' या हाकेला राजू प्रतिसाद का देत नाही? अहो, सरळ, साधी गोष्ट आहे. सुदृढ मूल **(Normal)** आठव्या-नवव्या महिन्यात हाक मारल्यावर वळून बघत. ८-९ महिने आई वडील, शेजारी-पाजारी, नातेवाईक दिवसातून पन्नास वेळा तरी त्याला हाक मारत असणार. तेव्हा मूल एकदा तुमच्याकडे बघतं. २५० दिवस × ५० वेळा. इतके वेळा मूल त्याचे नाव ऐकत असते. मग इथे एका दिवसात 'राजू' हाकेला प्रतिसाद देईल अशी अपेक्षा बरोबर आहे का? 'माझं नाव राजू आहे' हेच त्याला माहीत नाही, तर तो तुमच्याकडे वळून बघेल कसा? आणि दुसरं म्हणजे आपल्याशी कोणी फ्रेंच किंवा तत्सम (आपल्याला ज्ञात नसलेल्या) भाषेत बोलायला लागलं तर आपली काय अवस्था होईल? नुसता आवाज कानावर पडणं याला काहीच अर्थ नाही. त्यामुळे श्रवण यंत्र लावल्यावर त्याचा गोंधळच जास्त उडतो.

आवाजाची ओळख झाल्यावर त्या आवाजाप्रमाणे तसा उच्चार करायला शिकवणं आवश्यक ठरतं. त्यांना बोलायला कृत्रिमरीत्या शिकवावं लागतं. उच्चार घडवून आणावा लागतो.

उच्चार शिकविण्याच्याही काही पायऱ्या आहेत. मुलाला आवाज काढता





अनुक्रमणिका

येतो का इथपासून त्याला पूर्ण वाक्य लयबद्ध बोलता येतं का इथपर्यंत. आवा
काढता येतो म्हणजे स्वर उच्चारता येतो. वेगवेगळे स्वर उच्चारता येतात का,
लांबवता येतात का, पाहिजे तेव्हा थांबवता येतात का, आदि, मध्य, अन
ह्या तिन्ही स्थानांत काढता येतो का? व्यंजनं कुठली उच्चारता येतात? कुठल
स्थानात उच्चारता येतात? स्वरयुक्त व्यंजनं, संयुक्ताक्षरं उच्चारता येतात का? छो
वाक्यं, मोठी वाक्यं उच्चारता येतात का, वाक्यात थांबे बरोबर पाडता येत
का, चढउतार, लय, आघात व्यवस्थित देता येतात का इ. वरील प्रकारे मुलाच
उच्चाराचं मूल्यमापन करून त्याच्या प्रशिक्षणाला कुठपासून सुरुवात करायची
ठरवता येतं. प्रत्येक पायरीसाठी प्रयत्न करून जिभेचे, तोंडाचे, श्वासाचे, ओठ
इ. व्यायाम करवून घेऊन त्या पायऱ्या टप्प्याटप्प्याने ओलांडत मुलाचे उच्चार सुधार
लागतात. स्वर शिकवताना ओठांची स्थिती लक्षात आणून देऊन स्वरांचे उच्चा
करवून घेता येतं. प्रत्येक व्यंजनाचं स्थान दाखवून, त्याचे प्रयत्न करवून घेउ
उच्चारण करवून घेता येतं. प्रत्येक व्यंजनातील फरक समजावून देणं आवश्
ठरतं.

उदा. - 'प' आणि 'फ' मधला अल्पप्राण-महाप्राण फरक जाणवून देऊन त्याप्रम
उच्चार काढायला मुलाला मदत करणं. 'फ' म्हणताना हवेचा हातावर झोत ज
जोरात येतो, तोंडासमोर धरलेली मेणबत्ती विझते, कागदाचे कपटे उडतात,
दाखवून 'फ' आणि 'प' मधील फरक सांगणं आवश्यक ठरतं.

उच्चार झाले की हळूहळू भाषाविकासही घडवून आणावा लागतो. कृत्रिमरी
आणि जाणीवपूर्वक. तुला, मला, वस्तूंना, पदार्थांना नावं आहेत. राग, आ
दुःख व्यक्त करायला शब्द आहेत, बोलूनही आपण आपली कामं साधू शक
ह्याची जाणीवही त्यांना नसते. ती आपल्याला हळूहळू त्यांना करून द्यावी ला

आपण ऐकूनच बऱ्याच गोष्टी आत्मसात करत असतो, शिकत अस
पण हा नैसर्गिक आणि प्रभावी आकलनाचा मार्ग कर्णबधिर मुलांच्यात बंद झाल
असतो. दृश्य आणि स्पर्श माध्यमांचा जास्तीत जास्त उपयोग करून त्यांना शि
देणं आवश्यक ठरतं. प्रत्येक शब्द त्याला शिकवावा लागतो, त्याचं दृढीक
करून घ्यावं लागतं. एक उदाहरण पाहू म्हणजे समजेल.

आपल्या मुलांसाठी जशी बालवाडी असते तशा पहिल्या चार पाय
ओलांडल्यावर ही मुलं पहिलीत जातात.

उदा. 'कापणं' हे क्रियापद शिकवणे

पायरी १ मध्ये क्रियापद शिकवत नाहीत. प्रत्यक्ष वस्तूंच्या ओळखीवर जास्त भर दिसतो.

पायरी - २ - आपण एखादी वस्तू कापून दाखवणं

मी काय केलं? - कापलं

'कापलं' - अशी शब्दचिठ्ठी दाखवून कापण्याची खूण करणं.

"U" - ही खूण लयीसाठी 'काप' हे आपण एकदम उच्चारतो. का ऽऽ प ऽऽ असं उच्चारत नाही. हे पहिल्यापासून कळावं म्हणून.

पायरी - ३ तू कागद काप. (शब्दचिठ्ठी हनुवटीखाली धरणं, हाताने कापण्याची खूण करणं, तोंडाने उच्चारण करणं. अक्षर-ओळख हळूहळू होत असते.)

पायरी - ४ कागद काप, कापड काप. सुरीने काप.

कापण्यासाठी काय वापरू? - सुरी, विळी, कात्री इ.

इयत्ता -१ - लिंग भेदाप्रमाणे सामान्यरूप

बाबा आंबा कापतात.

आई आंबा कापते.

दादा आंबा कापतो.

गाळलेल्या जागा भरा. (दृढीकरण करून घेण्यासाठी)

मुलगी आंबा - (कापतो, कापते, काप)

दादा आंबा - (कातपो, तकापो, कापतो)

इयत्ता - २ विशेषणे शिकवणं

खसा खसा कापणं, कराकरा कापणे इ.

इयत्ता - ३, ४ वाक्प्रचार शिकवणं

हात कापणं, खिसा कापणं, गळा कापणं, कोंबडी कापणं, अंतर कापणं इ.

अशा प्रकारे आपण त्यांचा भाषाविकास घडवून आणू शकतो. हा भाषा विकास घडवून आणताना, वर्गात शिकवताना, नक्की कुठल्या पद्धतीचा अवलंब करावा याविषयी मतभेद आहेत. पूर्वीपासून वेगवेगळ्या मतप्रणाली अस्तित्वात असल्याचं दिसून येतं. यात खुणांची भाषा **(Sign Language)** मौखिक पद्धत **Oral Speech),** श्रवण पद्धत **(Hearing Method)** रॉचेस्टर पद्धत **(Rochester**

**Method)** आणि संपूर्ण संपर्क प्रणाली **(Total Communication)**. प्रत्येक पद्धतीची थोडक्यात माहिती करून घेऊ.

खुणांची भाषा ही कर्णबधिरांची नैसर्गिक भाषा किंवा मातृभाषा मानली जाते. मुलांना खुणा करायला शिकवल्या नाहीत तरी ती आपणहून खुणा करतातच. दैनंदिन गरजा, भावना ती ह्या खुणांच्या भाषेतून व्यक्त करू शकतात. आपली भाषा जशी दर बारा कोसांवर बदलते म्हणतात, तशा ह्या खुणाही संदर्भानुसार बदलत अतात. पण संवाद साधायच्या दृष्टीतून त्यामुळे काही अडथळा येत नाही. अमेरिकेत गॅलोटेड विद्यापीठ हे फक्त कर्णबधिरांचे विद्यापीठ आहे. त्यात खुणांची भाषाच वापरली जाते. काही लोकांचं म्हणणं असं आहे की कर्णबधिरांच्या शिक्षणाचं मूळ उद्दिष्ट त्यांना समाजात आणणं हे आहे. खुणांच्या भाषेमुळे ती समाजापासून दूरच राहतील. मुख्य समाज जी भाषा बोलतो तीच भाषा त्यांना शिकवली तर संवाद जास्त घडू शकेल. सामाजिकीकरण होऊ शकेल. ह्यात ओष्ठ्य वाचन **(Lip Reading)** आणि उर्वरित श्रवण शक्तीचा उपयोग करून भाषाविकास केला जातो. (श्रवण यंत्र लावून ऐकून ओष्ठ्यवाचनाच्या साह्याने भाषा समजून घेणे) कालांतराने या दोन्ही पद्धतीचा उपयोग केला जाऊ लागला. त्या पद्धतीला **Combine Approach** किंवा **MultiSensory Method** म्हणतात.

ओष्ठ्यवाचनाने शब्द ओळखणे हे काही सोपे काम नाही. त्याला बऱ्याच मर्यादा पडतात. सारख्या प्रयत्नांचे उच्चार कळत नाहीत. उदा. प, ब इ. ओष्ठ्य वाचनातील संदिग्धता कमी करण्यासाठी 'क्यूड स्पीच' पद्धत अस्तित्वात आली. ह्यात स्वरांसाठी चार हातांच्या स्थिती आणि व्यंजनांसाठी ८ हातांचे आकार वापरून ओष्ठ्यवाचन सुलभ करण्याचा प्रयत्न करण्यात आला.

रॉचेस्टर पद्धत ही कर पल्लवी **(Finger Spellings)** आणि मौखिक पद्धत **(Oral Method)** यांचा संयोग आहे. शिक्षक बोलताना प्रत्येक शब्द हवेत कर पल्लवीच्या साह्याने लिहून दाखवतो. त्यामुळे प्रत्येक शब्द आणि त्याचं व्याकरण समजायला मदत होते. पण दोन्हींचा एकदम एकाच वेळी वापर करणं अवघड आहे. मुलांनाही एकाच वेळी दोन्हीकडे लक्ष देणं अवघड आहे.

प्रत्येक पद्धतीत काही फायदे, काही तोटे आहेत, काही त्रुटी आहेत आणि कर्णबधिरांना शिकवताना नक्की कुठल्या पद्धतीचा अवलंब करावा याविषयी मतभेद आहेत. हे सगळं दूर करण्यासाठी १९७६ मध्ये ब्रिलने संपूर्ण संपर्क प्रणाली

आणली. ह्यात कुठल्याही एका पद्धतीवर भर नाही. खुणा, कर पल्लवी, ओष्ठ्यवाचन, उर्वरित श्रवणशक्तीचा वापर, चेहऱ्यावरील हावभाव, या सगळ्यांचा उपयोग करून मुलाच शब्दभांडार, भाषा, संकल्पना वाढीस लागाव्यात हा या तत्त्वप्रणालीचा उद्देश आहे. मुलाशी संवाद साधणं इथे महत्त्वाचं मानलं जातं. कुठली पद्धत वापरावी याला दुय्यम स्थान आहे.

शाळेच्या शैक्षणिक अभ्यासक्रमाबरोबरच कर्णबधिरांचं सामाजिकीकरण आणि पुनर्वसन करणं या दोन उद्दिष्टांवरही विशेष भर दिला जातो. त्यांना व्यावसायिक प्रशिक्षण देण्यात येतं. Screen Printing, टंकलेखन, हातमागावर विणणं, धुलाई यंत्रातून कपडे धुणं, फुलं तयार करणं, पुस्तक बांधणी, शिवणकला, भरतकाम, बाळंतविडे तयार करणं, साडीला फॉल पिको करून देणं, इ. इ. कंपनी कडूनही काही कामं मिळतात ज्या योगे ते पुढे आपल्या पायावर उभे राहू शकतात.

पहिली ते दहावी पर्यंत कर्णबधिरांसाठी शिक्षण सुविधा उपलब्ध आहेत. बालवाडीत मात्र कुठल्याही प्रकारची शिक्षण सुविधा नेहमीच्या (Normal Schools) शाळेत उपलब्ध नाही. विशेष शाळा म्हणजे फक्त कर्णबधिरांच्यासाठी असणाऱ्या शाळा (Special School) आणि एकात्म शिक्षण योजना म्हणजे नेहमीच्या शाळेत कर्णबधिरांसाठी सोय, Unit असणे, (Integration Schools). ११ वी पासून मात्र कर्णबधिरांना नेहमीच्याच शाळा-कॉलेजांमधून शिक्षण घ्यावं लागतं. कुठल्याही प्रकारच्या प्रशिक्षणाची त्याला जोड नसल्यामुळे हे त्यांना साहजिकच अवघड जातं. त्यामुळे यांचं भविष्य कुठला तरी छोटामोठा व्यवसाय सुरू करणं किंवा कुठे तरी नोकरी मिळवणं (१० वी नंतर) एवढंच मर्यादित होऊन जातं. अमेरिकेत जसे गॅलोटेड विद्यापीठ खास कर्णबधिरांसाठी आहे, तशी सोय भारतात नाही. पण अशा खडतर मार्गातूनही मार्ग काढून गेलेली काही कर्णबधिर मुलं आहेत. तोंडात बोटं घालायला लावतील एवढं यश या मुलांनी संपादित केलेलं आहे. त्यांपैकी काही नावं अशी -

पराग याडकीकर - एम. कॉम. आयकर विभागात नोकरी.

राजेश आपटे - एम. ए. (समाज शास्त्र), बी. एससी. (सूक्ष्मजीवशास्त्र), डी. फार्म, डी. एम. ए. 'सिरम' मध्ये Quality Control Officer म्हणून नोकरी.

प्रसन्न बापट - Electronics Diploma, संगणक अभ्यासक्रम शिकून तत्संबंधी





अनुक्रमणिका

कामं घेतो.
राजू सप्तर्षी - स्वतःची जाहिरातसंस्था आहे.
नचिकेत घाणेकर - **Commercial Artist** आहे. बरीच मुलं टेल्को आणि किर्लोस्कर मध्ये चांगल्या हुद्यावर नोकरीस आहेत. काही तरुण मंडळींनी एकत्र येऊन एक क्लबही स्थापन केला आहे. शंभराच्या वर याची सभासद संख्या आहे. यात प्रत्येक आठवड्याला एकत्र येणं, चर्चा करणं, बाहेरच्या व्यक्तींबरोबर गप्पा मारणं. काही हक्कांविषयी मागणी करणं इ. अनेक उपक्रम चालू असतात.

पण हे शिक्षणाचे प्रमाण खूप कमी आहे. या मुलांच्या स्वरूपात डोळ्यांसमोर एक प्रश्नचिन्ह उभं राहतं. या मुलांचं काय भविष्य आहे? ही अशीच समाजापासून दूर, फटकून राहणार का? अमेरिकेत कर्णबधिर व्यक्ती वकील, अभियंते, डॉक्टरसुद्धा आहेत, होऊ शकतात. मग इथे असं काही का घडत नाही? आपण नेमकं कुठे कमी पडतो? आपण यांच्यासाठी काय करू शकतो? विचार करकरूनही या प्रश्नांची उत्तर सापडत नाहीत. आपल्या हातात काय आहे? एवढंच आहे की, कर्णबधिर मुलाकडे वळून वळून बघितलं नाही, 'बिच्चारे' असं नजरेतून दाखवलं नाही तर त्याचा नक्कीच चांगला परिणाम होऊ शकेल...

✲ शुद्धध्वनी चाचणी - **Pure Tone Audiometry**

व्यक्तीला हेडफोन्स लावून वेगवेगळ्या वारंवारितेचे **(Frequency)** कमी जास्त तीव्रतेचे **(Loudness)** आवाज दिले जातात. व्यक्तीच्या प्रतिसादावरून श्रवणालेख काढला जातो. त्यावरून श्रवण दोष किती आहे आणि कुठे आहे ते कळू शकतं. ही व्यक्तिनिष्ठ स्वरूपाची चाचणी आहे.

नादकाटा चाचणी - **Rinne Test**

बऱ्याच मोठ्या गटासाठी उपयुक्त. कमी वेळात होते. रिने, वेबर आणि ए बी सी ह्या तीन चाचण्या यात अंतर्भूत आहेत. नादकाट्याला कंपने देऊन (ठराविक वारंवारितेची) ती व्यक्तीला ऐकवून ही चाचणी करण्यात येते. दोष कुठे आहे हे या चाचणीकडून कळू शकते. पण संख्यात्मक निदान होऊ शकत नाही.

✲ **BERA - Brain stem Evoked Response Audiometry**

ही वस्तुनिष्ठ चाचणी आहे. सहा महिन्यांच्या मुलावरही करता येते. अंतःकर्णात ध्वनिलहरी गेल्यावर विद्युतभार निर्माण होतो. तो इलेक्ट्रॉडच्या साह्याने मोजता





अनुक्रमणिका

येतो. ह्या तत्त्वावर बेरा चाचणी करतात. कपाळावर, कानामागे आणि डोक्यावर इलेक्ट्रोड ठेवले जातात. कानाला हेडफोन्स लावून वेगवेगळ्या तीव्रतेचे आवाज दिले जातात. कमीत कमी किती तीव्रतेला विद्युतभार तयार होतात ते संगणकाद्वारे मोजण्यात येतं. सरासरी श्रवणदोष कळतो. आलेख काढता येत नाही.

✻इम्पीडन्स - Impedance Test

मध्य कर्णातील नेमका दोष कळण्यासाठी उपयुक्त. एका ट्यूबच्या साह्याने कर्णपटलावर विशिष्ट हवेचा दाब सोडला ज़ातो. काही प्रमाणात आवाजही दिला जातो. पडदा (कर्णपटल) आवाजाला किती विरोध करतो, ते मोजलं जातं. हवेचा दाब कमी-जास्त करून पडद्याच्या हालचालीचे आलेख काढले जातात. त्यावरून खालीलपैकी निदान करून उपचार करण्यात येतात. कानात प्रमाणाबाहेर मळ, सर्दी साठणे, हाडांची साखळी सैल, घट्ट असणे, एखादे हाड कमी असणे, पडद्याला भोक असणे इ.

✻ Nuclear Implant -

Nuclear Implant बद्दल बरीच उलट सुलट चर्चा ऐकू येते. जादूसारखं काहीतरी - ज्यायोगे मुलं बोलू शकतील. ऐकू शकतील असा समज आहे. त्याबद्दल ही वस्तुनिष्ठ माहिती.

कानामागे कातडीच्या आत खड्डा करून receiver बसवला जातो. बाहेर एक श्रवणयंत्र लावणे अपरिहार्य आहे. श्रवणयंत्रात निर्माण झालेला विद्युतभार आतल्या receiver मध्ये शोषून घेतला जातो. receiver मधून निघालेली wire अंत:कर्णातील चेतातंतूपर्यंत पोचवलेली असते. त्यामुळे Receiver मधून विद्युत लहरी चेतातंतूपर्यंत पोचतात आणि ऐकू येते.

अंत:कर्णात शंखाकृतीत जर बिघाड असेल म्हणजे फक्त Sensory Hearing Loss असेल तरच उपयुक्त. यातून मिळणाऱ्या आवाजात गुणात्मकदृष्ट्या फरक असतो. बऱ्याच काळपर्यंत Programme ही असतो. प्रशिक्षणाशिवाय पर्याय नाही.

□□□

**ओ / १, अध्यापक निवास, पुणे विद्यापीठ,**
**पुणे - ४११००७**





अनुक्रमणिका

(भाषा आणि जीवनच्या १५:१/ हिवाळा १९९७ या अंकात सुधा क्षीरे यांचा डॉक्टर-रुग्ण संवाद' हा लेख प्रसिद्ध झाला होता. (पृ. २७-३४) या लेखापासून स्फूर्ती घेऊन सुरेश नाडकर्णी आणि अलका कुलकर्णी या अनुभवी डॉक्टरांनी आपले लेख पाठवले आहेत. ते या अंकात प्रसिद्ध करत आहोत. या लेखांमधून डॉक्टर-रुग्ण संवादाचे आणखी काही पैलू स्पष्ट होतात. - **संपादक**)

## डॉक्टर-रुग्ण संवाद..... जीवनमरण निगडित प्रश्न!

**डॉ. सुरेश नाडकर्णी**

'डॉक्टर-रुग्ण-संवाद' या विषयावर अनेक अंगांनी विचार करावा लागेल. सदरहू संवाद पूर्णतया अर्थवाही व्हावा हे अती महत्त्वाचे! तसा न झाल्यास, 'मला काय होते हे डॉक्टरला कळते आहे का' या विचाराने रोगी बेजार!... आणि रोगी नेमके काय सांगतो आहे याचे आकलन न झाल्याने डॉक्टर संभ्रमित... एकूण अविश्वासाचेच वातावरण.... दोन्ही बाजूंनी!

रोग्याच्या मातृभाषेतून संवाद साधला गेल्यास रोग्याला स्वतःच्या आजाराबद्दल 'सर्व काही' सांगता येते.... तो अडखळत नाही आणि डॉक्टरला त्यातला शब्दन् शब्द कळतोय याची खात्री झाली की रोग्याचा आत्मविश्वास बळावतो. हे जाणूनच संगणकाचा वापर करण्याचा प्रयत्न आंतरराष्ट्रीय पातळीवरून होत आहे. डॉक्टरला जे काही विचारायचे असते ते तो त्याच्या भाषेत विचारतो. संगणकात या भाषेचे रूपांतर/भाषांतर रोग्याच्या मातृभाषेत होते आणि संगणक रोग्याच्या भाषेत 'चक्क' विचारतो.... म्हणजे निरक्षरतेचा अडसरही दूर होतो! इतकेच नव्हे, तर रोग्याशी संपर्क साधणारी भाषा रोग्याच्याच ढंगाने बोलली जावी याविषयीची दक्षताही या संगणकाने घेतली आहे. यासाठी 'व्हॉईस ऑफ अमेरिका' सारख्या अमेरिकेच्या नभोवाणी वृत्त प्रसारण सेवेत असलेल्या 'विवक्षित' रेडिओवरून वृत्तनिवेदन करणारी व्यक्ती संगणकातूनही हिंदीतूनच बोलते. थोडक्यात काय... भारतातील अठरा पगड भाषांना सामावून घेणारा असा बहुभाषी संगणक निघाला तर तो कोल्हापूरच्या पहेलवानाला विचारून राहील, ''काय राव? काय म्हणतंय तुमचं डोस्कं....?''

डॉक्टर मंडळी आपसांत बोलताना वा परिचारिकेशी बोलताना इंग्रजीतून बोलतात. यामुळे 'आपल्याविरुद्ध काहीतरी ही मंडळी बोलताहेत.... आपल्यापासून काहीतरी लपवून ठेवताहेत...' अशी भावना रोग्यामध्ये निर्माण होते व हे संशयी





अनुक्रमणिका

वातावरण डॉक्टर-रुग्ण वा परिचारिका रुग्ण ह्यांच्या नात्यामध्ये अंतराय निर्माण करते. अर्थातच अत्यावश्यक ठरणारे रोग्याचे मनोमन सहकार्य यापायी दूर लोटले जाते! परिणामी तोटा रोग्याचा... तसाच वैद्यक उपचार पद्धतीचा!

भाषा बारा कोसांवर बदलते असे म्हणतात. हे ध्यानी घेऊनच, 'डॉक्टर-रुग्ण-संभाषण-पुस्तिका' रचण्याचे कार्य 'लोकवैद्यक' सारख्या संस्थांनी हाती घेतले आहे. विशेषेकरून तांत्रिक संज्ञांसाठी पारिभाषिक शब्द शोधले जाताना क्लिष्टता व दुर्बोधता निर्माण होतात. परंतु या शब्दांच्या जवळपास पोचणारे अगदी १०० टक्के अचूक नसलेले कैक शब्द आपल्या बोली भाषेत आहेत. 'अहिराणी-आदिवासी' यांसारख्या अनेक भाषांचाही या संबंधात विचार करणे क्रमप्राप्त ठरते. यात भर पोटभाषांची!

काही इंग्रजी शब्द जनमानसात स्थायिक झालेले आहेत. 'सलाईन'... 'इंजेक्शन'... एनिमा.... कॅथेटर... इ.इ. हे. या शब्दांचा स्वीकार करून मराठी भाषेत त्यांना स्थान द्यायला का बरे हरकत असावी? याहीपुढे जाऊन, एखाद्या स्थळी वा एखाद्या व्यक्तीकडून इंजेक्शनला 'विंजेक्शन' म्हटले जात असेल तर 'अंतःक्षेपण' वा 'सूचीभरण' यांसारखे शब्द का माथी मारले जावेत? रोग्याला भाषा कळणे हे अधिक महत्त्वाचे की पारिभाषिक शब्दांविषयीचा 'अट्टहास' महत्त्वाचा! दुसरे म्हणजे भाषावृद्धीसाठी इतर भाषांतील शब्द अंतर्भूत करून घ्यावेच लागतात. जगाची भाषा म्हणून आज ओळखली जाणारी इंग्रजी भाषा काय परिपूर्ण स्वयंभू-स्वतंत्र अशी आहे का? रोमन, ग्रीक, लॅटीन, फ्रेंच इतकेच काय पण भारतीय ('खाकी', 'सिपॉय', 'टिपॉय', 'जगरनॉट'- जगन्नाथाचा रथ, 'बंदोबस्त', 'घेराव' यांसारख्या अनेक) शब्दांपासूनही इंग्रजीची जडणघडण झाली आहे. इतकी की इंग्रजी शब्दकोशाच्या (भारतीय) आवृत्तीबरोबर भारतीय पुरवणी हल्ली जोडण्यात येऊ लागली आहे. हे जर सत्य तर मग 'हा शब्द संस्कृतमधला... तो फारसीतला वा उर्दूतला....' असा वाद घालण्यात कोणते बरे हंशील आहे? रेडिओला रेडिओ, सिग्नलला सिग्नल जर आपण सहजगत्या म्हणतो, तर सुटसुटीत एड्स, सोनोग्राफी, बायोप्सी हे शब्द बदलण्याचा अट्टहास का बरे आपण धरावा? कोणताही नवा शब्द स्वीकारण्यास मानवाचे मन तयार होत नाही. परिणामी एखादा नवा शब्द (अगदी 'रुग्णवाहिनी' सारखासुद्धा) वेडावाकडा, अस्वीकारार्ह त्याला वाटतो. लिपिक, अभियंता, उद्वाहन यांसारखे शब्द, इतकेच काय पण एकेकाळी भल्याभल्यांनी खिल्ली उडविलेले 'कुक्कुटपालन' यासारखे शब्द सतत वापरात राहिले आणि नंतर अतिपरिचयाने आज ते कुणाला

परके-वेडेवाकडे वाटत नाहीत.

अशा शब्दांच्या शोधात असताना कैकदा एखादा नवनिर्मित शब्द 'भाष शास्त्रांच्या नियमात न बसणारा' असण्याची शक्यताही नाकारता येणार नाही. नेत्रदीपक हाऊसफुल्ल... गानकोकिळा (कोकिळा कधी 'कुहू कुहू' करीत नाही.... कुहूकुहू करत तो 'मिस्टर' कोकिळ - 'मॅडम' कोकिळेला साद घालायला!) यांसारखे शब्द मराठी प्रचलित झालेच ना? मग डॉक्टर-रुग्ण संभाषणातसुद्धा रोग्याला पटकन समजणारे शब रुळले तर त्याला आडकाठी करणारे आपण कोण? ते भले भाषाशास्त्राच्या दृष्टी गैर असतील, वैद्यकशास्त्राच्या दृष्टीने बिनचूक असले की झाले!

रोग्याच्या 'पचनी' पडणारी भाषा वापरली गेल्याने रोग्याचे आरोग्य शिक्ष तर सुलभतेने होईलच, पण त्याहून महत्त्वाचे म्हणजे रोगविषयक स्वयंनियंत्रणाचा भा अधिक चांगल्या प्रकारे रोग्याकडून सांभाळला जाईल. उदा. मधुमेही! त्याचा आहा त्याची इन्सुलिन-मात्रा, वैयक्तिक स्वच्छता, मधुमेही-उपद्रव. हे सर्व आरोग्य शिक्षणाच्य मदतीने त्याने स्वतःच सांभाळावे अशी अपेक्षा आधुनिक वैद्यकशास्त्रात केली जात म्हणूनच 'शब्दबंबाळ' न झालेले साहित्य, संभाषण, निवेदन, चित्रण साध्या-सोप 'आकलनीय' स्वरूपात सादर केले जावे ही अपेक्षा - कारण ती पण डॉक्टर रुग संवादांची इतर अंगेच होत!

एखाद्या शल्यचिकित्सकाकडे गेल्यानंतर त्याने आदेशिलेल्या शस्त्रक्रियेबद्द रोग्याच्या मनात अपार औत्सुक्य असते. त्याचे कुतूहल शमन करणे अत्यावश्य ठरते. यासाठी 'मल्टिमिडिआ'- बहुमाध्यम - 'सी डी रॉम' तयार करण्यात आ आहेत. परिणामी संगणकाच्या पडद्यावर शस्त्रक्रिया प्रत्यक्ष दिसू शकते. तसेच तिच अनुषंगाने उद्भवणाऱ्या अनेक प्रश्नांची (किती दिवस इस्पितळ वास्तव्य? कामाव कधी जाणार.... इ.इ.) उत्तरेही या पडद्यातूनच उपलब्ध होण्याची सुविधा आज उपलब झाली आहे. डॉक्टर-रुग्ण-अपरोक्ष-संवादाचा हा उत्तम नमुना आहे!

डॉक्टर-रुग्ण-संभाषण मुद्रित माध्यमांतूनही होत असते. वृत्तपत्रातून नियतकालिकातून हे होत असते. तथापि चुकीचे शब्द ('मेनिन्जायटिस' मस्तिष्कावरणासाठी वा 'डोक्यात पाणी झालेल्या'साठी मेंदूज्वर हा शब्द वापरला गेल्या जसे दृष्टीस पडते) या माध्यमातून निसटण्याची शक्यता असते. याची खबरदारी

घेतली गेली तर डॉक्टर-रुग्ण संभाषण ढेपाळणा आहे! तथापि 'मेंदूज्वर' वा 'गॅस्ट्रो'सारखे शब्द रुजवायला वृत्तपत्रांसारख्या मुद्रित माध्यमांनीच हातभार लावला आहे हे मान्य करावयास हवेच.

डॉक्टर-रुग्ण-संभाषण साधताना स्थानिक म्हणींचा-वाक्प्रचारांचा विचार प्रामुख्याने केला जाण्याची आवश्यकता निर्माण होते. तेथील अंधश्रद्धाही या संभाषणात अनुस्यूत होऊ शकतात. 'कौल घेतला होता'.... 'या महिन्यात बाहेरची बसली नाय' 'ज्या गावच्या बाभळी...' (आनुवांशिक रोगांच्या संबंधात) 'ठेविले अनंते तैसेचि राहावे.... चित्ती असो द्यावे समाधान'.... यांसारखी वाक्ये डॉक्टर-रुग्ण-संभाषणाला असीमित परिमाण देऊन ज़ातात! एकूण काय, रोग्याचा संवाद डॉक्टरला समजायला हवा तसाच तो डॉक्टरचा रोग्याला.... कारण रोग्याच्या दृष्टिकोणातून तो त्याच्या जीवनमरणाशी जुळलेला एक संबंध आहे!

□□□

**पाचवा मजला, फ्लॅट क्र. ३८-३९,**
**म्युनिसिपल बिल्डिंग, जोबनपुत्रा कम्पाऊंड नाना चौक,**
**मुंबई ४०० ००७.**

---

मराठी भाषेची प्रार्थना
सुखकर्ती जनशक्ती तृप्ती ज्ञानाची
अखंड पुरवी भक्ती मराठी भाषेची
सर्वांगसुंदर भाषा ही आमुची
शब्दांचे माधुर्य गोडी श्रवणाची

(दि. ३०-११-१९९७ च्या 'सन्मित्र' या ठाणे जिल्ह्याच्या दैनिकामधून,)

**प्रेषक**
**मृणालिनी शहा**





अनुक्रमणिका

# डॉक्टर---रुग्ण संवाद

डॉ. अलका कुलकर्णी

अगदी अलीकडच्या काळापर्यंत रुग्ण-डॉक्टर यांचे नाते भक्त व उपास्
दैवत याप्रमाणे असायचे. डॉक्टरवरच्या अढळ श्रद्धेने व विश्वासानेच रुग्ण अध
बरा व्हायचा. परंतु बदलत्या काळाच्या ओघात हे नातेही वाहावत चाललेले दिसते
म्हणून तर रोजच्या वर्तमानपत्रातून डॉक्टर-रुग्ण विसंवादाच्या बातम्या अधिव
ठळकपणे आढळतात.

डॉक्टर आपल्या परीने सुसंवाद साधण्याचा प्रयत्न करतातच पण अलीकडे
डॉक्टर व रुग्ण यांच्यात पिढ्यानपिढ्यांचा संबंध नसतो. म्हणून आंतरिक जिव्हाळ
उत्पन्न होण्याचा प्रश्नच उद्‌भवत नाही. मग उरतो तो कोरडा, रुक्ष व्यवहार. या व्यवहाराल
मग तडे जाण्याची शक्यता खूप.

आताशा 'फॅमिली फिजिशियन' ची कल्पना हळूहळू मूळ धरू लागली आहे,
साकारू लागली आहे. हा साधारणपणे एम.बी.बी.एस. अथवा तत्सम योग्यतेचा डॉक्टर
असतो. त्याने वेळोवेळी एखाद्या कुटुंबाला सेवा द्यावी अशी कल्पना असते. पण
जेव्हा गरज पडते तेव्हा हा डॉक्टर तज्ज्ञ डॉक्टर व रुग्ण यांच्यातला दुवा म्हणून काम
बघतो. आधुनिक वैद्यकीय उपचारपद्धतीत एखाद्या गुंतागुंतीच्या आजारासाठी तर
डॉक्टरांची पूर्ण टीमच लागते. उदाहरणार्थ, कॅन्सर घ्या- रुग्णाला सर्जन, फिजिशियन,
केमोथेरपिस्ट, मानसोपचारतज्ज्ञ, मेडिकल सोशल वर्कर या सर्वांची मदत घ्यावी लागते.
अशा वेळेला हा सर्वांना जोडणारा दुवा म्हणून काम करू शकतो. 'फॅमिली फिजिशियन'
महत्त्वाची भूमिका निभावू शकतो. हा ही संवादाचाच एक महत्त्वाचा भाग आहे.

डॉक्टर-रुग्ण संवाद जर सुसंवाद करायचा असेल तर दोन्हीही बाजूंनी तसे
प्रयत्न व्हायला हवेत. सर्वप्रथम डॉक्टरांच्या बाजूने आपण ही दिशा समजावून घेऊ
या. डॉक्टरांना भेटण्यापूर्वीच या संवादाची सुरुवात होते. म्हणूनच डॉक्टरांची स्वागतिका
ही तत्पर, हसतमुख असली पाहिजे. हे थोडे कौशल्याचेच काम आहे. नंबर लावून
देण्याची भुणभूण पेशंट सतत करत असतात. त्यांना समजाविणे, थोपवून धरणे हे
फार कंटाळवाणे- कटकटीचे काम आहे. त्यात खरोखरच एखादा गंभीर पेशंट आला
तर त्यास तातडीने आत पाठविणे इत्यादी गोष्टी कराव्या लागतात. यासाठी अल्पसे

प्रशिक्षण केले तरी काम भागण्यासारखे असते. त्याचा चांगला असा उपयोगही होतो.

डॉक्टर-रुग्ण संवाद हा डॉक्टरांनी प्रत्यक्ष संबंध येण्यापूर्वीच असा सुरू होतो.

''बाई, माझा नंबर लावून द्या ना जरा. मला संध्याकाळी पाच वाजेनंतर बस नाहीए.'' पेशंट.

''मग तुम्हाला सकाळी यायला काय होतं?'' स्वागतिका.

''सकाळी ना माझ्याकडे पाहुणे आले होते. काय करू?'' पेशंट.

''काय होतंय पेशंटला?'' स्वागतिका.

अशा प्रश्नाने सुरुवात होते. गंभीर आजार असणाऱ्यांनी खरे तर आधी वेळ ठरवून यायला हवे, पण आपल्याकडे मुख्यतः खेड्यापाड्यांतून तर हे अजून दूरच आहे. अपॉईंटमेंट घेणे व घेतल्यास ती पाळणे याची साधी जाणीव सुद्धा लोकांना नाहीए. विशेषतः ग्रामीण भागातून ही पद्धत राबविणे फारच अवघड. उदाहरणार्थ मी जिथे काम करते तेथे आजूबाजूच्या खेड्यांवरून रुग्ण येतात. त्यांच्या गावातून एकमेव येणारी बस सकाळी ७-८ वाजता निघते. परत मुक्कामाला संध्याकाळी ५-६ वाजता पोचते. अशा वेळी नेमका संवाद करताना वेळेचे भान ठेवून कार्यक्रम उरकणे फारच कौशल्याचे व जिकिरीचे काम होऊन बसते. यातही खूप वेळ खर्च करावा लागतो.

डॉक्टर-रुग्ण संवादाकामी डॉक्टराचे तपासणी-कक्ष ही अतिशय बोलके असू शकते. बालरोगतज्ज्ञ तर याची साक्ष देतील, आता माझ्या तपासणी कक्षात ताकाचा डेरा घुसळणारी यशोदा व लोण्यासाठी हट्ट धरून बसलेल्या सावळ्या कृष्णाचे चित्र आहे. मला वाटते ते खूपच बोलके आहे. याशिवाय अशा तपासणी कक्षांतून प्राण्यांची, पक्ष्यांची, मजेशीर चित्रे, एखाद दुसरे दणकट खेळणे लहानशा पेशंटचे लक्ष आकृष्ट करून घेते. त्यामुळे तपासणी सुकर होते. आपल्याकडे साधारणपणे लहान मुलांनी तोंड उघडले की 'गप्प बस' असेच अनेकदा दटावले जाते. या उलट बालरोगतज्ज्ञ मुलांशी अधिक बोलतात. त्यांना 'टाटा, सलाम, जयहिंद' करतात. यामुळे अनेक पालकांना आश्चर्य वाटते. बालरोगतज्ज्ञांची शिकवण अशी की रोग्याशी नेहमी बोलावे. काही काही जाती-जमातीत पेशंटशी अधिक बोलणे अनावश्यक समजले जाते. त्यांची समजूत अशी आहे की यामुळे बाळाला नजर लागते. याचीही पालकांना भीती वाटते. हे आपल्याकडेच होते असे नाही. अगदी नेल्सन ह्या आंतरराष्ट्रीय ख्यातीच्या ग्रंथातून सुद्धा या संदर्भात विवेचन आलेले आहे. काही मेक्सिकन जमातीत लहान मुलांशी बोलले किंवा त्यांच्याकडे बघून हसले तरी त्याला नजर लागेल अशी भीती पालकांना

वाटते. जर 'गॉड ब्लेस यू' असे डॉक्टरने म्हटले तर पालक निश्चिंत होतात. अनेकविध जाती-जमाती व विविध आर्थिक स्तरांवरच्या माणसाचे मनोव्यापार असे गुंतागुंतीचे असतात याचेही भान डॉक्टरांना हवे.

पेशंटच्या चेहऱ्यावरचे सूक्ष्म हावभाव, बसण्या-उठण्या-बोलण्याची लकब, डॉक्टरांना बरेच काही सांगून जाते. ही **Body language** ओळखण्याचे कौशल्य प्रयास करूनच मिळते. ते तसे मिळवायला हवे. अनेकदा पेशंट जे सांगत नाही ते अनेकविध प्रश्न विचारून.... त्यांच्याकडून काढून घ्यावे लागते. वैवाहिक आयुष्यातले प्रश्न हाताळणे हे तर फार कौशल्याचे काम. उदाहरणार्थ, अनेकदा जोडपी येतात पण मूल होत नाही म्हणून आलो असे सांगण्यास त्यांना फार संकोच होतो. अशा बायकांच्या अगदी बारीकसारीक तक्रारी असतात. मग डॉक्टरनेच 'लग्न होऊन इतकी वर्षे झाली... अजून गर्भधारणा झाली नाही' या साठी काही चाचण्या करू या का आपण? असे म्हणून कोंडी फोडावी लागते. मग पेशंटना हायसे वाटते. या संदर्भात एक किस्सा सांगण्यासारखा आहे. लग्न होऊन एक वर्ष झाले तरी त्यांचे वैवाहिक जीवन सुरू झाले नव्हते. सांगणार कोणाला? शेवटी हिंमत करून बाई डॉक्टर म्हणून ते माझ्याकडे आले. त्यांचा प्रॉब्लेम इतका छोटासा होतां की फक्त एक प्रिस्क्रिप्शन आणि थोडासा सल्ला यावर त्यांचे काम भागले. पंधरा दिवसांनी ज्या हसतमुख चेहऱ्याने दांपत्य आले त्यामुळे मी लगेच काय ते समजले. पावती मिळाली.

पेशंटशी बोलताना नजरानजर **(eye contact)** कशी होते हे फार महत्त्वाचे. काही काही डॉक्टर्स पेशंटच्या चेहऱ्याकडे व डोळ्यांकडे पाहायचे टाळतात. भावनिक गुंतवणूक होऊ नये हा यामागे हेतू असतो. काही वेळा असे डॉक्टर्स खूप बडे असतात. त्यांच्याकडे रुग्ण एखाद वेळेसच जातो म्हणून की काय स्वतः फार अलिप्त राहायचे असे ठरवतात. त्यामुळे मग काही चुका होतात. डॉक्टरने प्रांजळपणे पेशंटशी बोलायचे असेल तर **Eye contact** हवाच. अगदी निरक्षर पेशंटला सुद्धा डॉक्टर कसा आहे हे जाणवते. तो आंतरिक जिव्हाळ्याने, तळमळीने काम करतोय की वरवर, डॉक्टर चांगला आहे की पैसे काढू? हे सर्व पेशंटला उमजते. कधी लवकर तर कधी उशिरा.

माझ्या माहितीतले एक प्रख्यात नेत्रशल्यचिकित्सक आहेत त्यांच्या तपासणी कक्षात पेशंट आणि त्यांच्या नातेवाइकाला बसायला धडपणे जागाच नाही. डॉक्टर बसतात व बाकी लोकांनी उभे रहायचे. हे अतिशय चुकीचे आहे, डॉक्टर कितीही मोठा असला तरी शेवटी पेशंट हेच त्याचे 'मायबाप सरकार' असतात हे विसरून

कसे बरे चालेल? अशा ठिकाणी संवाद व्हावा तरी कसा?

काही डॉक्टर तपासणी पूर्ण झाल्याबरोबर पटकन औषधे लिहून देतात व अमक्या - अमक्या दिवशी या असे सांगतात हे ही चुकीचे आहे. पेशंट, त्याचे नातेवाईक यांना पेशंटच्या आजाराविषयी माहिती दिली गेलीच पाहिजे. त्यांना समजेल अशा सोप्या भाषेत सांगायलाच हवे. काल तापाचे औषध घेतलेला पेशंट सांगायला लागला की ताप उतरत नाही तर मोठे शास्त्रीय कारण देण्यापेक्षा 'मूग पेरले की तीन महिन्यांनी उसळ मिळते, त्याला खत, पाणी द्यावे लागते ना? तसेच या आजाराचेही आहे.' असे म्हटले तर लगेच पटते.

काही अर्धवट शिकलेले लोक फारच हुज्जत घालतात. खूपच आडवे-तिडवे प्रश्न विचारतात. प्राथमिक शिक्षक हा प्रकार नेहमी का करतात हे मात्र कळत नाही.

औषधे लिहून देताना पेशंटच्या लक्षणांचा पुनरुच्चार करून 'अमके अमके औषध याच्यासाठी आहे, अमके अमके औषध या कारणासाठी, अमके अमके लक्षण आपोआप बरे होईल.' असे विधान करावे. त्यावरून आपण सांगितलेल्या सर्व गोष्टी डॉक्टरांच्या ध्यानात असून त्यांनी योग्य उपाययोजना केलीय ही भावना बळकट होते.

स्त्री-पेशंट तपासताना त्यांच्या नातेवाईकांशी बोलणे ही अगदी तारेवरची कसरत असते. अशा वेळी ही 'तुमची मुलगी की सून?' असे विचारून त्या अनुषंगाने पुढचे बोलणे करणे सोईचे होते. सासुरवाशिणींना नेहमी विशेष आपुलकीने वागवावे मूल होत नसेल तर व नवऱ्यामध्ये दोष असेल तर सासू-सासरा, मुलीचे आई-वडील सर्वांना एकत्र बसवून शांतपणे पण ठामपणे सारे काही समजावून 'यात मुलीचा काहीही दोष नाही.' हे सांगावे लागते.

अनेकदा असे होते की एखादा सीरियस पेशंट येतो, वेळेवर नेमका वैद्यकीय उपचार न मिळाल्यामुळे असे झाले असले तर डॉक्टर लोक चिडतात, रागावतात, नातेवाइकांना त्यांच्या चुका सांगतात, नातेवाइकांना मनातून स्वत:चा राग तरी आलेला असतो किंवा परिस्थितीमुळे हतबल झाल्याची जाणीव तरी होते. मग हा सर्व राग निघतो डॉक्टरवरच. बरे 'सीरियस पेशंट परवडला पण त्याचे नातेवाईक आवरा' असे सांगायची पाळी येते. खासगी प्रॅक्टिस करताना अशा वेळी फारच वैताग येतो. प्रत्येक नवा येणारा नातेवाईक अपेक्षा करतो की डॉक्टरांनी मला सारे काही समजावून सांगावे. आता त्याला यातले काही कळत नाही या सोबतच हे नेहमी शक्यच नसते हेही ध्यानात घ्यायला हवे. म्हणून सीरियस पेशंट आला तर दोनच जबाबदार नातेवाइकांशी बोलणे सोईचे असते. जो नातेवाईक असे म्हणतो की बिलाची मुळीच काळजी करू नका

तो कधीच बिल देणारा नसतो हेही या संदर्भात ध्यानात घेणे मनोरंजक आहे.

माझे कार्यक्षेत्र महाराष्ट्राच्या उत्तरेला सातपुडा पर्वताच्या पायथ्याशी आहे. इथून दहा-बारा किलोमीटर्सच्या अंतरावरच गुजरात आणि मध्यप्रदेशाच्या सीमा आहेत. आदिवासी जमातींच्या वस्त्या आहेत. भाषिक संवाद साधता यावा म्हणून मी प्रयत्नपूर्वक त्यांच्या बोलीभाषेतील काही बारकावे आत्मसात करण्याचा विचार करत असते. या बाबतची एक गमतीशीर आठवण सांगण्यासारखी आहे. आजारी मूल आले की मी विचारायचे, 'हुरू' तर त्यांच्या आया एकदम दचकून माझ्याकडे बघून रागाने मान हलवायच्या. मला प्रश्न पडला की मूल तर तापाने फणफणले आहे मग बाई 'ताप नाही' असे का म्हणतेय? एकदा एका जाणत्याला विचारले तर तो चक्क हसूच लागला, हसता हसता त्याची पुरेवाट झाली. तो म्हणाला, ''ताई, तुम्ही काय विचारताहात?'' मी म्हटले की मुलाला ताप आहे का असे मी विचारतेय. यावर तो म्हणाला की पावरी भाषेत-सातपुड्यातील पावरा या आदिवासी जमातीची भाषा- तापासाठी शब्द आहे 'होरी' आणि 'हुरु' म्हणजे दारू-मद्य. भिल्लांच्या भिलोरी भाषेत 'जोरू' म्हणजे ताप, ज्वर आणि 'होरू' म्हणजे दारू-मद्य. नशीब माझे लवकर कळले नाहीतर विसंवादच व्हायचा.

आमच्या गावात इंडियन मेडिकल असोसिएशन मार्फत एक परिसंवाद घेणार आहोत 'डॉक्टर-रुग्ण संवाद.' यात दोघेही म्हणाले, डॉक्टर आणि रुग्ण मुक्तपणे चर्चा करतील. अशा प्रकारच्या चर्चेतून काही भरीव निष्पत्ती झाली तर चांगलेच पण या निमित्ताने निदान मोकळेपणी चर्चा तर होऊ शकेल ही आशा आहे. यातून एकमेकांबद्दलचे गैरसमज दूर होऊन संवाद साधला जाऊ शकेल असा विश्वास वाटतो. खरे म्हणजे 'मी पेशंटच्या बाबतीत काही गृहीत धरणार नाही' आणि 'नेहमी सदसद्विवेकबुद्धीने काम करेन' ही प्रार्थना डॉक्टरांना बळ देणारी ठरेल यात शंकाच नाही. रुग्णांच्या बाजूनेही त्यांच्या अडचणी मांडणारे कुणी पुढे येईल का? एकूण यातून संवादाचे एक आवर्तन पूर्ण होऊ शकेल.

□□□

**'कौस्तुभ' जुना मोहिदा रोड**
**शहादा धुळे ४२५ ४०९**





अनुक्रमणिका

# मराठी भाषा जगवायची असेल

**गंगाधर गाडगीळ**

मराठी भाषेच्या भवितव्याबाबत अलीकडे सतत चिंता व्यक्त केली जात आहे. एका बाजूने इंग्रजी आणि दुसऱ्या बाजूने हिंदी या भाषा मराठी भाषेवर आक्रमण करीत आहेत; असं आपल्याला उघड उघड दिसत आहे. शास्त्र, तंत्रज्ञान, आर्थिक व्यवहार आणि व्यवस्थापन या क्षेत्रांत इंग्रजी भाषेचं आधीच असलेला वर्चस्व वाढत चाललं आहे. आणि राजकारण, चित्रपट संगीत, दृक्श्राव्य प्रसार माध्यमांद्वारे होणारी करमणूक इत्यादी क्षेत्रांत हिंदीचा प्रभाव वाढत आहे. त्याचप्रमाणे शासकीय यंत्रणेत व व्यवहारात आणि सार्वजनिक क्षेत्रांतील उद्योगांत हिंदीचा अधिकाधिक प्रमाणात वापर व्हावा म्हणून हिंदी भाषक लोक अत्यंत आक्रमकपणे प्रयत्न करीत आहेत आणि त्यात त्यांना पुष्कळ यश मिळत आहे. यामुळे मराठी भाषा जेथे वापरली जाते त्या क्षेत्राचा संकोच होत आहे. इतकंच नव्हे तर मराठी भाषाच अलीकडे शुद्ध स्वरूपात एंकायला मिळणं मुष्किल होऊ लागलं आहे. रोजच्या व्यवहारात, सार्वजनिक व्यासपीठांवर आणि दूरदर्शनच्या कार्यक्रमात आज अत्यंत भ्रष्ट मराठीचा वापर चाललेला आपल्याला दिसतो. या मराठीत पंचवीस ते पन्नास टक्के शब्द इंग्रजी असतात आणि त्यात काही चुकत आहे. असं कोणालाही वाटत नाही. अगदी मराठी रंगभूमीवरचे कलावंत नाटकांच्या तालमीसाठी अगर नाटकावर विचार-विनिमय करण्यासाठी जमले म्हणजे किती इंग्रजी शब्द व वाक्प्रचार वापरतात ते पाहिलं म्हणजे चकित व्हायला होतं.

ही परिस्थिती चिंताजनक आहे हे राजकीय, सामजिक व सांस्कृतिक क्षेत्रांतील सर्वच मंडळी मान्य करतात. या बाबतीत केवळ चिंताच व्यक्त करणं नव्हे तर उद्विग्न व संतप्त होणं हा महाराष्ट्राच्या सार्वजनिक जीवनातला एक नित्याचा व आवश्यक सोपस्कार झाला आहे. हा संताप व्यक्त करताना जी आगपाखड होते तिच्यात प्रथमतः आपल्या मातृभाषेचा अभिमान नसल्याबद्दल संपूर्ण मराठी समाजच गुन्हेगार ठरवला जातो. त्यानंतर पाळी येते ती महाराष्ट्राच्या शासनाची. मराठी भाषेचं संरक्षण, विकास करण्याची आपली जबाबदारी ते पार पाडत नाहीत असा आरोप तावातावानं केला जातो. यानंतर सगळ्यांत जहरी आगपाखड होते ती इंग्रजी माध्यामाच्या शाळांत आपल्या मुलांना पाठवणाऱ्या शहरी पांढरपेशा वर्गावर. असं करताना जर जात

काढली नाही व उच्चवर्णीयांना भाषाद्रोही ठरवलं नाही, तर महाराष्ट्रातल्या तथाकथित विचारवंतांच्या पुरोगामित्वाला बट्टा लागेल. तेव्हा उच्चवर्णीय लोक, इंग्रजी प्रेमी आणि बहुजनसमाज मराठी प्रेमी असा भेद केला जातो. त्याच प्रमाणे शहरी माणसं इंग्रजीप्रेमी आणि ग्रामीण जनता मराठीची अभिमानीअसंही एक चित्र निर्माण केलं जाते.

ठराविक विचार ठराविक प्रकारे व्यक्त करणाऱ्या माणसांना महाराष्ट्रात विचारवंत मानलं जातं. आणि ढोबळ ठोकळेबाज भूमिका घेण्याकडेच बऱ्याचशा मराठी पत्रकारांची प्रवृत्ती असते. तेव्हा या विषयावर जे साधारणतः बोललं आणि लिहिलं जातं, तिकडं दुर्लक्ष करून प्रत्यक्ष परिस्थिती काय आहे ते समजून घेण्याचा आपण प्रयत्न केला पाहिजे.

यासाठी आधुनिक महाराष्ट्राची परंपरा आपण विचारात घ्यायला हवी. इंग्रजी राज्य येण्यापूर्वी पंतोजींच्या खासगी शाळा गावोगावी होत्या. यात मिळणारं शिक्षण पंतोजींच्या स्वतःच्या ज्ञानाच्या शिदोरीवर अवलंबून असे. एखादा लिहिणं, वाचणं, पाढे, हिशेब व काही संतादिकांची कवनं यांच्या पलीकडे जात नसे. तर दुसरा कोणी गणित, मराठी भाषा व साहित्य आणि संस्कृत यांचं बरंच अधिक ज्ञान आपल्या विद्यार्थ्यांना देत असे. पुढे इंग्रजी राज्य आल्यावर लोकांना शिक्षण हवं होतं ते मुख्यतः इंग्रजी भाषेचं. कारण इंग्रजीचं ज्ञान असलं म्हणजे मुंबईच्या व्यापाऱ्यांकडे व सरकारच्या शासन यंत्रणेत चांगल्या नोकऱ्या मिळत असत. म्हणजेच माऊंट-स्टुअर्ट एल्फिन्स्टननं जर मराठीतूनही शिक्षण द्यावं, असा आग्रह धरला नसता, तर मराठीतूनही शिक्षण द्यावं असा आग्रह तेव्हा तरी मराठी माणसांकडून धरला गेला नसता. मराठी भाषेचे व्याकरणकार दादोबा पांडुरंग यांना सरळ सरकारी शिक्षण संस्थेच्या इंग्रजी शाळेतच प्रवेश मिळावा अशी त्यांच्या वडलांची इच्छा होती आणि स्वतः दादोबा पांडुरंग शाळांवर देखरेख करणारे व्हिजिटर झाल्यावर त्यांनीही मुलांना सरळ इंग्रजी शाळेतच घालण्याच्या या पालकांच्या घाईचा सखेद उल्लेख आपल्या तपासणीच्या अहवालात केला होता. अशा प्रकारे मराठी विषयीची आस्था दादोबा, बाळशास्त्री, नाना शंकरशेट इत्यादींना होती. सर्वसामान्य मराठी माणसांना नव्हती.

एल्फिन्स्टननं जरी मराठीतून शिक्षण देण्याचा आग्रह धरला होता तरी प्राथमिक शिक्षणच पूर्णपणे मराठीतून देण्यात येत असे. नंतरच्या काळातही मी शिकलो तेव्हा माध्यमिक शिक्षणात इंग्रजीला स्थान असले तरी बाकीचे विषय मराठीतून शिकवले जात. पण इंग्रजी चौथीत गेलं म्हणजे गणित, विज्ञान वगैरे विषय इंग्रजीतून शिकवले

जात. फार काय, मी शाळेत होतो तेव्हा संस्कृत देखील इंग्रजीतून शिकण्याची मुभा व सोय होती. कॉलेजात शिक्षण तर प्रथमपासून पूर्णपणे इंग्रजीत होतं आणि कॉलेजच्या शिक्षणात मराठीला इतकं बेताचं स्थान होतं की कॉलेजात एक अर्धवेळ मराठीचा प्राध्यापक नेमून भागत असे. केवळ मराठी या विषयाचेच सगळे पेपर घेऊन बी.ए. होणं मी १९४२ साली कॉलेज सोडलं त्यानंतर शक्य झालं.

स्वातंत्र्य मिळाल्यावर सर्व शालेय शिक्षण मातृभाषेतून देण्याची व्यवस्थाच नव्हे तर सक्ती करण्यात आली (पुढे ही सक्ती बंद झाली) आणि तेव्हापासून आपल्या मुलाला इंग्रजी माध्यमाच्या शाळांत पाठविण्याची प्रवृत्ती फोफावू लागली. कारण मराठी माध्यमाच्या शाळांत सर्व शिक्षण मराठीतूनच दिलं जाऊ लागलं. तेथील विद्यार्थ्यांना इंग्रजी नीटसं येत नसे. विद्यापीठातील शिक्षणही संपूर्णपणे मातृभाषेतून देण्याची व्यवस्था करण्यात आली आणि त्यासाठी चार निराळ्या विषयांवरची पुस्तकं मराठीत तयार करण्याचा बराच प्रयत्न करण्यात आला व पैसाही खर्च झाला. पण या बाबतीत झालेली प्रगती फारशी समाधानकारक आहे असं त्या त्या विषयावरील तज्ज्ञ मंडळी म्हणताना आढळत नाहीत आणि आजही तांत्रिक विषयांचा अभ्यास इंग्रजीतूनच करावा अशी प्रवृत्ती सर्वत्र आढळून येते.

यावरून असं दिसून येतं की मराठी हेच शिक्षणाचं माध्यम असावं असा आग्रह शिक्षणतज्ज्ञ व मराठीचे अभिमानी पूर्वी व आताही धरत असले तरी शिक्षणव्यवस्थेत मराठीला दुय्यम स्थान असावं अशी इंग्रजी आमदानीपासून महाराष्ट्रात परंपरा आहे. ह्या परंपरेला मराठी समाजानं मोठ्या पोट तिडिकेनं कधीच विरोध केलेला आढळत नाही. इतकंच नव्हे तर शिक्षण क्षेत्रात मराठी माणसांवर ही मराठी लादली जाऊ नये असं अनेक मराठी माणसांना वाटतं आणि इंग्रजीतून शिक्षण घेतलं तर शिक्षणही चांगलं मिळतं आणि व्यावहारिक दृष्ट्या देखील ते फायदेशीर असतं असं सामान्यपणे मानलं जातं.

शासनानं, मराठी भाषेत शिक्षण दिलं जावं, मराठीत शासकीय व्यवहार चालावेत आणि एकंदर मराठी भाषेला प्रतिष्ठा मिळून तिचा विकास व्हावा म्हणून प्रयत्न केले नाहीत असा ठपका त्याच्यावर ठेवला जातो. ह्या आरोपात पुष्कळच तथ्य असले तरी या बाबतीत घटनात्मक, आर्थिक, राजकीय व शासकीय परिस्थिति काय आहे ह्याचाही आपण विचार करायला हवा. तसंच या परिस्थितीमुळे मराठी भाषेसाठी शासनानं करायच्या प्रयत्नांवर मर्यादा पडण्याची शक्यता आहे ते देखील पाहायला हवं.

भारत हे एक संघराज्य आहे. मुळात भारताची घटकराज्ये एकभाषिक नव्हती आणि एकभाषिक राज्याची मागणी संकुचित आहे. देशाच्या सांस्कृतिक एकात्मतेला बाधा आणणारी आहे. अशी खुद्द पंडित नेहरूंची व इतर अनेक राष्ट्रीय पुढाऱ्यांची भावना होती. पुढे लोकांच्या आग्रही मागण्यांतून एकभाषिक राज्ये निर्माण करण्यात आली.

परंतु सर्वच एकभाषिक राज्यांत अन्यभाषिक अनेक समूह अस्तित्वात आहेत आणि अन्यभाषिक लोकांच्या प्रवेशावर व वास्तव्यावर बंदी घालण्याचा कोणताही अधिकार भाषिक राज्यांना नाही. त्यामुळे जेथे आर्थिक संधी उपलब्ध आहेत त्या त्या राज्यात औद्योगीकरणामुळे विकास पावणाऱ्या शहरात अन्य भाषिकांचं प्रमाण वाढत आहे. मुंबईत तर मराठी लोक अल्पसंख्य झाले आहेत आणि बंगलोर, हैद्राबाद वगैरे शहरे त्याच दिशेने वाटचाल करीत आहेत. पूर्वी भारतातले ऐंशी टक्के लोक ग्रामीण भागात राहात होते व शहरी लोकवस्तीचं प्रमाण वीस टक्के किंवा त्याहून कमी होतं. आता मात्र महाराष्ट्रासारख्या प्रगत राज्यात शहरी लोकसंख्या अदमासे तीस टक्के आहे आणि अशीच परिस्थिती गुजरात, कर्नाटक इत्यादी औद्योगिक दृष्ट्या प्रगत राज्यात निर्माण होत आहे.

परभाषिक लोक पुरातन काळापासून निरनिराळ्या भाषिक प्रदेशात येऊन स्थाईक झालेले आहेत व होत असतात. पण पूर्वी सामान्यपणे दळणवळणाची साधने फारशी उपलब्ध नसल्यामुळे सामान्यत: त्यांची संख्या अल्प असे आणि कालांतराने ते त्या प्रदेशाची भाषा, रीतिरिवाज वगैरे स्वीकारीत असत. काही वेळा ते मोठ्या प्रमाणावर जेते म्हणून येत. अशा परिस्थितीत स्थानिक लोक त्यांचा धर्म, रीतिरिवाज व भाषा स्वीकारीत असत. परंतु काही झालं तरी एखादा प्रदेश प्राधान्यानं एकभाषिक असावा अशी परिस्थिती असे.

परंतु आजच्या भारतात मात्र भाषिक राज्यात आलेल्या अन्य भाषकांनी त्या राज्याची भाषा स्वीकारावी अशी परिस्थिती नाही. उलट त्यांनी आपल्या भाषेलाच चिकटून राहावं किंवा भारतीय संघराज्याची शासकीय भाषा आपली म्हणून स्वीकारावी अशी परिस्थिती आहे. याला कारणं दोन. एक तर आपल्या घटनेनुसार भाषिक अल्पसंख्याकांना अनेक प्रकारचे हक्क देऊन त्यांची सांस्कृतिक अस्मिता सुरक्षित राहावी अशी तरतूद करण्यात आली आहे. उदाहरणार्थ या अन्य भाषिकांना आपल्या मुलांना मातृभाषेतून शिक्षण देण्याचा व त्यासाठी स्वत:च्या स्वतंत्र शिक्षणसंस्था काढण्याचा हक्क आहे. त्याचप्रमाणे त्यांची संख्या पुरेशी मोठी असली तर शासनाने आपली पत्रके

वगैरे त्यांच्या शाळेत त्यांच्या भाषेत त्यांना उपलब्ध करून द्यावी अशीही तरतूद आहे. शिवाय त्या राज्याच्या प्रादेशिक भाषेऐवजी इंग्रजी व हिंदी या दोन केंद्र सरकारच्या शासकीय भाषांत ते आपल्या मुलांना शिक्षण देऊ शकतात. ह्या हक्कांचा कधी कधी प्रत्यक्षात नसलेला वेगळेपणा प्रस्थापित करण्यास उपयोग करण्यात येतो. उदाहरणार्थ, ग्रामीण भागात राहणारे व मराठी भाषेचाच वापर करणारे महाराष्ट्रातले काही मुसलमान मुंबईत आले की आपल्या मुलांना उर्दू भाषिक शाळांत घालतात.

तेव्हा एकभाषिक राज्ये स्थापन झाली असली तरी ती एकभाषिक राहू नयेत अशी परिस्थिती आर्थिक विकासामुळे व घटनेतील तरतुदींमुळे निर्माण झालेली आहे.

आर्थिक विकासामुळे आणि घटनेतील तरतुदींमुळे भारतातल्या प्रत्येक नागरिकाला केवळ त्याच्या या मातृभाषेचे ज्ञान असून चालणार नाही. त्याला केंद्र सरकारच्या अधिकृत शासकीय भाषांपैकी म्हणजे इंग्रजी व हिंदीपैकी एका तरी भाषेचं ज्ञान असणं आवश्यक झालं आहे. याचं एक कारण असं की आपल्या घटनेनुसार सगळा भारत देश ही एकसंध व खुली बाजारपेठ आहे. हिंदुस्थानात कुठेही निर्माण होणारा माल सर्व देशांत कुठेही विकण्याचा अधिकार प्रत्येक उत्पादकाला आहे. नियंत्रित अर्थव्यवस्थेच्या काळात यावर काही बंधनं होती. पण आता ही बंधनं जवळजवळ पूर्णपणे काढून टाकण्यात आली आहेत. यामुळे भारतातला प्रत्येक उत्पादक सबंध भारत ही आपल्या मालाची बाजारपेठ आहे असं मानतो. या बाजारपेठेत माल विकण्यासाठी त्याला मालाची देशभर जाहिरात करावी लागते आणि देशभर पसरलेली एक वितरण व्यवस्था निर्माण करावी लागते. यासाठी निरनिराळ्या प्रादेशिक भाषांचा उपयोग करण्याऐवजी देशातल्या सर्व लोकांना कळेल अशी एकच भाषा वापरणं त्याला सोईस्कर व काटकसरीचं वाटणं साहजिक आहे. या देशातल्या सर्व लोकांना कळतील अशा भाषा जर अस्तित्वातच नसत्या तर या उत्पादकांना प्रादेशिक भाषांचा उपयोग निरुपायानं करावा लागला असता. पण त्यांच्या सुदैवानं अशी परिस्थिती नाही. भारत सरकारच्या हिंदी आणि इंग्रजी या अधिकृत शासकीय भाषांपैकी निदान एक देशातल्या प्रत्येक शिक्षित नागरिकाला यावी अशी आवश्यकता आपल्या घटनेनं निर्माण केली आहे आणि अशी तरतूदही केलेली आहे.

याचे कारण आपली घटना केंद्र सरकारला प्राधान्य देणारी आहे. या देशातील आर्थिक, राजकीय व शासकीय सत्ता बऱ्याचशा प्रमाणात केंद्र सरकारच्या हातांत एकवटलेली आहे. परराष्ट्रीय संबंध, संरक्षण, चलन नियंत्रण, रेल्वे, विमान वाहतूक, वगैरे अनेक खाती केंद्र सरकारच्या ताब्यात आहेत. शिवाय शिक्षण वगैरे इतर अनेक





अनुक्रमणिका

क्षेत्रांत राज्य सरकारांबरोबर केंद्र सरकारलाही भाग घेता येतो. समाजवादी अर्थ व्यवस्था स्वीकारल्यामुळे अनेक मोठे-मोठे उद्योग व वित्तीय संस्था केंद्र सरकारच्या मालकीच्या झाल्या आहेत. अखिल भारतीय शासकीय क्षेत्रातील कर्मचाऱ्यांची भरती व नियंत्रण केंद्र सरकारच करते आणि हे कर्मचारी केंद्र शासनातच नव्हे तर राज्यातील शासनातही महत्त्वाची स्थाने भूषवीत असतात.

आपल्या घटनेने आधीच केंद्र सरकारला दिलेल्या भरपूर अधिकारांत जवाहरलाल नेहरू व विशेषतः इंदिरा गांधी यांच्या कारकीर्दीत घटनेत दुरुस्त्या करून वाढ करण्यात आली. शिवाय राज्य सरकारांची अनुमती मिळवून राज्य सरकारांचे अनेक अधिकार बळकावण्यात आले. समाजवादी, नियंत्रित अर्थव्यवस्था निर्मण करून या अधिकारात अधिकच भर घालण्यात आली आहे. त्यामुळे या देशातल्या अगदी सामान्य नागरिकालाही आपले नित्याचे व्यवहार करण्यासाठी इंग्रजी, हिंदी भाषांचं ज्ञान असणं आवश्यक झालं आहे आणि नोकरी मिळवायची असेल तर इंग्रजी व हिंदी (विशेषतः इंग्रजी) भाषेचं ज्ञान अत्यावश्यक झालं आहे. या उलट मुंबईसारख्या महाराष्ट्राच्या राजधानीत देखील मराठी भाषा न जाणणारे लक्षावधी लोक राहतात. त्यामुळे त्यांचं फारसं अडत तर नाहीच पण उलट या मुंबईच्या जीवनातील बरीचशी उच्च पदी ते भूषवीत असतात.

केंद्र सरकारचं व त्या बरोबरच हिंदी व इंग्रजी या भाषांचं माहात्म्य वाढण्यास घटनेतील आणखी एक तरतूद कारणीभूत झाली आहे ती म्हणजे विशिष्ट कारणांसाठी राज्य सरकारे बरखास्त करण्याचा केंद्र सरकारला असलेला अधिकार. या अधिकाराचा आतापर्यंत फार मोठ्या प्रमाणावर दुरुपयोग करण्यात आला आहे. कारण या अधिकाराचा दुरुपयोग होऊ नये, अशी कोणतीही यंत्रणा आतापर्यंत तरी अस्तित्वात नव्हती व नाही. त्यामुळे देशातील सर्व राज्यांत एक तर काँग्रेस पक्षाची सरकारं होती किंवा काँग्रेस पक्षाच्या हाती असलेल्या केंद्र शासनाला वचकून राहणारी अन्य पक्षांची सरकारं होती. साहजिकच केंद्र सरकारनं अधिकार बळकावयाचे व राज्य सरकारनी ते मुकाटपणं सहन करायचं, असा प्रकार वर्षानुवर्षे चालू होता. त्यातच केंद्र सरकारकडे पैसा अधिक असे. कारण भरपूर व वाढतं उत्पन्न देणारे कर केंद्र सरकारच्या हाती होते. शिवाय लागेल तेवढा पैसा रिझर्व बँकेकडून कर्ज म्हणून घेण्याचा अधिकार होता. यामुळे राज्य सरकारे नेहेमी केंद्र सरकारवर आर्थिक साहाय्यासाठी अवलंबून असत आणि या परावलंबित्वाचा उपयोग केंद्र सरकार आपले अधिकार क्षेत्र वाढविण्यासाठी सतत करीत असे.

आता उदार व खुले आर्थिक धोरण स्वीकारल्यामुळे परिस्थिती बदलली असली

तरी इंग्रजी व हिंदी आणि विशेषत: इंग्रजी भाषेचं माहात्म्य मात्र कमी न होता अधिकच वाढलं आहे. कारण खाजगी क्षेत्र बाजार पेठेसाठी उत्पादन करतं आणि सबंध भारत ही एक बाजारपेठ असल्यामुळे या बाजारपेठेत व्यवहार करण्यासाठी इंग्रजी अगर हिंदी (विशेषत: इंग्रजी) भाषेचा उपयोग करणं त्याला सोईस्कर पडतं.

शिवाय भारत हा आर्थिक बाबतीत इतर देशांपासून आता अलग राहिलेला नाही. तो अधिकाधिक प्रमाणात आंतरराष्ट्रीय बाजारपेठेचा भाग झाला आहे. आपला आयात निर्यात व्यापार झपाट्यानं वाढत आहे आणि बहुराष्ट्रीय कंपन्या आता मोठ्या प्रमाणावर भारतात भांडवल गुंतवून विविध प्रकारच्या मालाचं उत्पादन व वितरण करीत आहेत. आंतरराष्ट्रीय बाजारपेठेत मुख्यत: इंग्रजी भाषा वापरली जाते आणि बहुराष्ट्रीय कंपन्यांनाही इंग्रजीत व्यवहार करणं सोईस्कर वाटतं. आपल्या कंपन्यासुद्धा वाढत्या प्रमाणात जागतिक बाजारपेठेत प्रवेश करीत असल्यामुळे इंग्रजी भाषा वापरणं त्यांना आता पूर्वीपेक्षाही सोईस्कर व फायदेशीर वाटतं.

उच्च शिक्षण व शास्त्रीय संशोधन या क्षेत्रात देशी भाषांचा उपयोग करणं शक्य आहे. पण जगातलं प्रचंड ज्ञानाचं भांडार आपल्या देशी भागात सध्या उपलब्ध नाही आणि यापुढेही ते आणायचं म्हटलं तरी व्यावहारिक दृष्ट्या शक्य नाही. शिवाय जागतिक बाजारपेठेत आपल्या उच्च शैक्षणिक संस्थांच्या प्रमाणपत्रांना फारशी किंमत नाही आणि जी काही आहे ती झपाट्याने घालवायचा प्रयत्न ह्या संस्था जणू अहमहमिकेनं करीत आहेत. त्यामुळे परदेशातील शिक्षण संस्थात शिक्षण घेण्यासाठी आपले हुषार विद्यार्थी वाढत्या प्रमाणात जात आहेत आणि इंग्रजी भाषेचं महत्त्व त्यांच्या दृष्टीनं अधिकाधिक वाढत आहे.

तेव्हा आज आर्थिक व घटनात्मक कारणांमुळे अशी परिस्थिती निर्माण झाली आहे की भारतातल्या सुशिक्षित माणसाला इंग्रजीचं ज्ञान असणं आवश्यक आहे. पण त्याच्या मातृभाषेचं ज्ञान त्याला नसलं तरी त्याचं चालू शकतं. निदान अगदीच अडत नाही.

महाराष्ट्रात तर ही परिस्थिती विशेष प्रमाणात आहे. मद्रास शहरात गेलं तर तेथे रस्त्यांच्या नावांच्या पाट्या किंवा बसगाड्या कुठे चालल्या आहेत ते दाखवणाऱ्या पाट्या तमिळमध्ये आहेत. त्यामुळे तमिळ भाषा येत नसली तर शहरात फिरणं कठीण जातं. इतरही क्षेत्रात तामिळनाडूच्या शासनानं अत्यंत आग्रही भूमिका घेतल्यामुळे त्या राज्यात राहणाऱ्या माणसाला तमिळ भाषा येणं अनिवार्य नसलं तरी आवश्यक झालं आहे. अनेक राज्यांत न्यायालयात कामकाजही त्या राज्यांच्या भाषेत अधिकाधिक

प्रमाणात चालत आहे. तेव्हा राज्य सरकारांनी आणि त्या राज्यातल्या लोकांनी मनावर घेतलं तर इंग्रजीबरोबर त्या राज्याची भाषाही तेथे राहणाऱ्यांना येणं बरंचसं आवश्यक आहे अशी परिस्थिती निर्माण करता येते. पण महाराष्ट्रात तसा प्रयत्नही फारसा झालेला नाही. रेल्वे स्थानकावर, विमानतळावर, अगर रस्त्यात हिंडताना देखील मराठी भाषा येणं आवश्यक आहे असं जाणवतही नाही आणि या बाबतीत सरकारला व लोकांनाही फारशी खंत वाटते असं दिसत नाही.

याला अनेक कारणं आहेत. त्यातलं एक म्हणजे महाराष्ट्रात परवापर्यंत राज्य करणाऱ्या काँग्रेस पक्षाचं दुबळं नेतृत्व. भारतीय राजकारणात गांधी युग सुरू झाल्यावर सतत दुय्यम दर्जाची माणसं महाराष्ट्रातल्या काँग्रेस पक्षाचं नेतृत्व करीत राहिली. त्या काळात मद्रासमध्ये राजगोपालचारी व कामराज, बिहारमध्ये बाबू राजेंद्रप्रसाद, बंगालमध्ये सुभाषचंद्र बोस, संयुक्त प्रांतात (प्रांताचा उत्तर प्रदेश) पंडित गोविंद वल्लभपंत वगैरे पुढारी मोठे प्रभावी होते. ते काही केवळ महात्मा गांधींच्या प्रकाशात चमचमणारे परभृत तारे नव्हते. त्यांना त्यांच्या प्रांतातच नव्हे तर अखिल भारतीय पातळीवर मोठी प्रतिष्ठा होती. सगळ्या देशाचं राजकारण चालवण्यात ते महत्त्वाचा भाग घेत होते. या उलट, महाराष्ट्रात देव, गाडगीळ, जेधे वगैरे पुढारी त्या तोलामोलाचे नव्हते. गांधीजींनी त्यांना पुढारी केलं होतं. अखिल भारतीय पातळीवर त्यांचा जवळजवळ काहीच प्रभाव नव्हता आणि महाराष्ट्राचं राजकारण देखील ते स्वतंत्रपणे चालवत नव्हते. त्या राजकारणाची सूत्रं सरदार वल्लभभाई पटेल यांच्या हातात होती. संयुक्त महाराष्ट्राची चळवळ यशस्वी झाल्यावर त्या चळवळीच्या पुढाऱ्यांच्या हातात महाराष्ट्र राज्याची सूत्रं गेली नाहीत. ती गेली यशवंतराव चव्हाणांच्या हातात. ते मुख्य मंत्री झाले काँग्रेस श्रेष्ठींच्या कृपेमुळे आणि ते स्वयंभू पुढारी होत आहेत असं आढळून येताच त्यांना पद्धतशीरपणे नेस्तनाबूत करण्यात आलं.

या राजकीय पार्श्वभूमीमुळे महाराष्ट्राच्या अस्मितेची जपणूक करणारं असं राजकीय नेतृत्व महाराष्ट्राला मिळालंच नाही. येथील विरोधी पक्षातील मंडळी देखील आपल्या अखिल भारतीय निष्ठांना प्राधान्य देणारी होती. त्यामुळे संयुक्त महाराष्ट्राच्या चळवळीत जी अभूतपूर्व जागृती झाली होती ती वाया गेली.

मुंबईचा महाराष्ट्रात समावेश झाला तो संयुक्त महाराष्ट्राच्या चळवळीमुळे आणि विशेषतः मुंबईतल्या मराठी माणसांच्या निर्धारामुळे. या गोष्टीला केंद्रीय नेतृत्वाचा कडकडीत विरोध होता आणि त्यामुळे मुंबईला महाराष्ट्रापासून अलग ठेवण्याचा व तेथे मराठी माणसांना दुय्यम स्थान देण्याचा पद्धतशीर प्रयत्न झाला. मुंबई प्रदेश काँग्रेस





अनुक्रमणिका

कमिटी महाराष्ट्र काँग्रेस कमिटीपासून अलग ठेवण्यात आली व तिचं नेतृत्व महाराष्ट्राविषयी निष्ठा बाळगणाऱ्या मराठी माणसांच्या (स.का. पाटील त्यांपैकी नव्हते) हाती राहू नये अशी काळजी घेण्यात आली. मुंबईत मोठमोठे केंद्राच्या मालकीचे आर्थिक प्रकल्प उभारण्यात आले व त्यात नोकऱ्या देताना मराठी माणसांना प्राधान्य देण्यात आले नाही. त्यामुळे मुंबईतील बिगर मराठी वस्ती सतत वाढत गेली.

एरवी देखील पूर्वीपासून मुंबईच्या आर्थिक जीवनात मराठी माणसांचं स्थान दुय्यम होतं. मुंबईतले मोठे उद्योग व घाऊक व्यापार अन्य भषिकांच्या ताब्यात होता. किरकोळ दुकानदारी व छोटे उद्योग काही प्रमाणात मराठी माणसांच्या हातांत होते. पण युद्धकाळात आणि नंतरही मराठी माणसांची या क्षेत्रातही पिछेहाट झाली आणि केवळ दुय्यम दर्जाच्या नोकऱ्या करणारा वर्ग एवढंच मुंबईत मराठी माणसांना स्थान राहिलं. त्यामुळे उद्योगधंद्याच्या क्षेत्रांतून मराठी माणसाबरोबर मराठी भाषाही हद्‌पार झाली. फार काय मुंबईतले हजारो लोकांचा चरितार्थ चालवणारे फेरीवाल्यांचे व टॅक्सीवाल्यांचे व्यवसायही बिगर मराठी भाषिकांच्या हाती गेले. मुंबईत राहात्या जागांच्या किंमती इतक्या वाढल्या की मराठी माणूस मुंबईबाहेर फेकला गेला आणि महाराष्ट्राची राजधानी असणारे मुंबई शहर आर्थिक दृष्ट्या व लोकसंख्येच्या दृष्टीनंही मराठी लोकांच्या हातून गेलं. आता ते केवळ महाराष्ट्रात आहे इतकंच. केवळ मराठीपणाचा अभिमान बाळगणाऱ्या पक्षाला मुंबईत बहुसंख्येनं निवडून येणं अशक्य आहे असं शिवसेनेला देखील आढळून आलं आणि मराठीपणाचा आग्रह कमी करून हिंदुत्वावर तिला अधिकाधिक प्रमाणात भर द्यावा लागला.

मुंबईच्या रस्त्यात व बाजारपेठेत मराठी भाषेला पूर्वीपासून दुय्यम स्थान होतं. घराबाहेर पडलं की मुंबईच्या धेडगुजरी हिंदीत नाहीतर इंग्रजीत व्यवहार करायचे अशी मुंबईकराला पूर्वापार सवय होती. तसंच आर्थिक दृष्ट्या आपण दुर्बल आहोत, आपला शेटजी अगर वरिष्ठ अन्यभाषिक असायचा याचीही त्याला सवय होती आणि युद्धोत्तर काळात व संयुक्त महाराष्ट्राच्या निर्मितीनंतरही ही परिस्थिती कायम राहिली नव्हे मराठी माणूस अधिकाधिक प्रमाणात दुय्यम स्थानावर ढकलला गेला आणि आज मराठी माणसं आणि मराठी संस्था अत्यंत दीनवाणेपणानं मुंबईत अंग चोरून वावरत आहेत. यात काही विपरीत आहे असंही बापड्यांना वाटत नाही.

ह्या गोष्टीला काही प्रमाणात तरी आळा घालणं महाराष्ट्राच्या शासनाला शक्य होतं. उघडपणे कायदेशीर मार्गांनी आणि छुप्या मार्गांनीही करणं शक्य होतं. पण महाराष्ट्राच्या राज्यकर्त्यांना काँग्रेस पक्षात अखिल भारतीय पातळीवर अतिशय दुय्यम

स्थान होतं. त्यामुळे दिल्लीकरांची मर्जी सांभाळणं हे त्यांचं आद्य कर्तव्य झालं होतं. साहजिकच मुंबईत मराठी माणसांना महत्त्व देण्याचा 'संकुचितपणा' करणं त्यांना फारसं शक्य नव्हतं. पुन्हा मुंबईतल्या उद्योगपतींचे व व्यापाऱ्यांचे हात थेट दिल्लीपर्यंत पोहोचलेले होते. त्यामुळे महाराष्ट्र शासनानं त्यांच्या मार्गात अडथळे आणण्याचा प्रयत्न केला तर दिल्लीला जाऊन ते शासनाचे निर्णय बदलून घेत असत.

पण महाराष्ट्र शासनानं तसा प्रसंग या लोकांवर फारसा येऊच दिला नाही. कारण महाराष्ट्राच्या दुबळ्या राजकीय नेतृत्वाला मुंबईचं काय होतं याची फारशी पर्वा नव्हती. एक तर मुंबई त्यांना फारशी समजलीच नाही आणि तिच्यावर काबू ठेवण्याइतकं कर्तृत्व त्यांच्या अंगी नव्हतं. शिवाय त्यात त्यांना रसही नव्हता. ज्या ग्रामीण भागातून ते निवडून आले होते; त्यांचं भलं करण्यात त्यांचं राजकीय हित होतं. तेवढं ते करीत होते किंवा निदान तसं केल्याचं नाटक करीत होते आणि मुंबईकडे मात्र ते एखाद्या लुटारूच्या नजरेत पाहात होते. मुंबईतून मोठ्या प्रमाणात महसूल व कर्जाच्या रूपानं पैसा गोळा करायचा आणि ग्रामीण भागात तो खर्च करायचा असा क्रम शासकीय पातळीवर चालला होता आणि वैयक्तिक पातळीवर अवैध मार्गांनी, भ्रष्टाचार करून गब्बर व्हायचं असा त्यापैकी अनेकांचा प्रयत्न असायचा. बापडा मराठी माणूस लाचलुचपत कितीशी करणार? त्यामुळे सर्वच क्षेत्रांत मराठी माणसं सारखी डावलली जायची.

केंद्राच्या मालकीच्या आर्थिक उपक्रमात तर मराठी माणसांना काहीच स्थान नव्हतं व नाही. त्या बाबतीत आपण काही करावं असं आमच्या राज्यकर्त्यांना वाटलं नाही. आणि वाटलं असतं तरी ते त्यांना शक्य झालं नसतं.

केवळ मुंबईत अशी परिस्थिती असती आणि महाराष्ट्राच्या अन्य भागात मराठी भाषेला मानाचं स्थान मिळालं असतं तर समाधान मानता आलं असतं. पण तशीही परिस्थिती नव्हती व नाही. महाराष्ट्रातल्या ग्रामीण भागाचा झपाट्याने संकोच होत आहे. या राज्यात उद्योगधंद्याची वाढ झपाट्याने होत आहे आणि महाराष्ट्रातील अदमासे वीस टक्के लोक आता शहरात राहतात. पुणे, औरंगाबाद, कोल्हापूर, इचलकरंजी, सांगली, जळगाव, अकोला, नागपूर, इत्यादी शहरे भराभर मोठी होत आहेत आणि या शहरातले उद्योगधंदे व अनेक व्यवसाय परप्रांतीय उद्योजकांच्या व व्यापाऱ्यांच्या हातात आहेत. आता खुद्द पुण्यातली माणसं रस्त्यांवर व दुकानांत मोडक्यातोडक्या हिंदीत बोलू लागली आहेत. औरंगाबाद रेल्वे स्टेशनवरच्या कर्मचाऱ्यांशी मराठी बोललं तर चालत नाही. कारण त्यांना मराठी येत नाही. असंच चालू राहिल

तर महाराष्ट्राच्या शहरातील परभाषिकांची संख्या फारच मोठी होईल आणि नागरी भागातले मराठी लोक फक्त आपल्या घरातच मराठीचा उपयोग करतील.

निदान ग्रामीण भागात तरी मराठी भाषकांचं आर्थिक नियंत्रण राहील असं जर कोणाला वाटत असेल तर तो भ्रम आहे. कारण आर्थिक विकासाबरोबर ग्रामीण भागांचं देखील असं शहरीकरण होत आहे. नागरी जीवनात उपलब्ध असलेल्या अनेक सुखसोयी आता ग्रामीण भागात उपलब्ध होत आहेत. आता गावातही निव्वळ धान्याची आणि कापडाची दुकानं नसतात. सायकली, स्कूटर, रेडिओ, विजेची उपकरणं, औषधं इत्यादी अनेक वस्तू आता ग्रामीण भागात विकल्या जात आहेत. छोटे व मध्यम आकाराचे उद्योगही तेथे सुरू होत आहेत. बँका आहेतच. शहरात आहे त्याप्रमाणे या खेड्यातील उद्योगधंद्यांच्या क्षेत्रात परभाषिक लोकांचं वर्चस्व प्रस्थापित होण्याची शक्यता आहे. नव्हे, तसं होताना दिसत आहे. म्हणजे ग्रामीण भागातही मराठी माणूस व मराठी भाषा यांच्या महत्त्वाचा संकोच होऊ लागला आहे.

जमिनीची मालकी व शेती या क्षेत्रात तरी मराठी माणूस आक्रमकपणे पाय रोवून उभा आहे असं आज तरी दिसतं आहे आणि जमिनीच्या मालकी विषयींचे कायदे व सहकारी चळवळ यामुळे ही परिस्थिती अशीच कायम राहील असं भासत आहे. पण ही परिस्थिती कायम राहील हा केवळ भ्रम आहे. कारण जसजसं शहरीकरणाचं प्रमाण वाढतं आहे तसतसं शेतजमिनीचं बिगरशेत जमिनीत रूपांतर होत आहे व अधिकाधिक प्रमाणावर होणार आहे. तसं झालं म्हणजे जमिनीची मालकी मराठी माणसाच्या हातून अन्यभाषकांच्या हाती जाईल. कोकण रेल्वे होऊ लागल्यावर कोकणातील किती जमीन परप्रांतीयांनी घेतली त्याची आकडेवारी प्रसिद्ध झाली तर मराठी लोकांना आश्चर्याचा धक्का बसेल आणि जमीनविषयक कायदे असले तरी त्यातून नाना पळवाटा लोकांनी काढल्या आहेत. अनेक सिनेमा नटनट्या व मोठे उद्योजक शेतकरी झाले आहेत. ह्यांपैकी बहुसंख्य माणसं मराठीभाषक नाहीत.

सहकारी संस्था आज मराठी माणसांच्या ताब्यात आहेत हे खरं. पण सहकाराचं सरकारीकरण व राजकीयीकरण झाल्यामुळे ती चळवळ आता आर्थिक दृष्ट्या सकस व स्वावलंबी राहिलेली नाही. सरकारी भांडवल व सरकारी संरक्षण यांवर ती अवलंबून आहे. भ्रष्टाचारानं ती पोखरली आहे आणि सरकारचा आधार काढून घेतला गेला तर तो कोसळून पडेल आणि सरकारचा आधार असूनही अनेक सहकारी साखर कारखाने आजारी पडले आहेत. इतर अनेक सहकारी बँकांची व अन्य संस्थांची तीच अवस्था आहे. सारी नियंत्रणं व सवलती जाऊन जर या क्षेत्रात खुली अर्थव्यवस्था आली





अनुक्रमणिका

तर यातल्या बहुसंख्य संस्था धडाधड कोसळून पडतील.

ज्या सरकारी आधारावर व नियंत्रणावर या संस्था आज तगून आहेत ते आणखी किती काळ टिकून राहील हा प्रश्नच आहे. कारण या संस्थांच्या आर्थिक गरजा व मागण्या सारख्या वाढत आहेत आणि हे ओझं वाहून नेणं सरकारला उत्तरोत्तर अवघड होत चाललं आहे. राज्यसरकारं अधिकाधिक प्रमाणात कर्जबाजारी आणि दिवाळखोर होत चालली आहेत. तेव्हा आज ना उद्या या सहकारी संस्थांवर होणारा खर्च सरकारला कमी करावा लागेल व त्यांना दिलेलं अवास्तव व महागडं आर्थिक संरक्षणही काढून घ्यावं लागेल आणि तसं झालं म्हणजे त्या कोसळतील.

ग्रामीण भागातील नेत्यांच्या हाती असलेल्या शिक्षणसंस्थांच्या बाबतीत असंच होण्याचा धोका आहे. कारण त्यांतल्या अनेक सरकारी मदतीवर अवलंबून आहेत. तसंच भ्रष्टाचारानं पोखरलेल्या आहेत आणि त्यांतल्या अनेक निकृष्ट दर्जाचं शिक्षण देतात.

हे डोलारे कोसळले की ही कार्यक्षेत्रं कार्यक्षम उद्योजकांच्या व संघटकांच्या हाती जातील आणि ही मंडळी मराठी भाषक असण्याची शक्यता फारच थोडी आहे. असं झालं म्हणजे मराठी भाषेच्या प्रभाव क्षेत्राचा आणखीनच संकोच होईल.

अर्थात मराठी माणसांत उद्योजकांचा एक मोठा आणि प्रभावी वर्ग निर्माण झाला तर तो या सहकार व शिक्षण सम्राटांची जागा भरून काढू शकेल आणि त्यांच्यापैकी जे कार्यक्षम आहेत, ते आपल्या स्थानांवर टिकून राहतील. पण आज तरी मराठी माणसांतून उद्योजक मोठ्या प्रमाणावर निर्माण होत नाहीत. खरं म्हणजे ते निर्माण होण्यावर महाराष्ट्राचं व मराठी भाषा आणि संस्कृती याचं भवितव्य अवलंबून आहे. हा विषय फार मोठा आहे. पण या पूर्वीच त्यावर मी एक विस्तृत लेख लिहिला असल्यामुळे मी त्याचं येथे विस्तारानं विवेचन करीत नाही.

मराठी भाषेचं आणखी एक दुर्दैव असं की ती हिंदी भाषेच्या फार जवळची आहे. या दोन्ही भाषांची लिपी एकच आहे. तसंच व्याकरण व शब्दसंपदा यांतही खूपच साम्य आहे. यामुळे मराठी माणसाला हिंदी भाषा सहज समजू शकते आणि म्हणून ती वापरल्यामुळे त्यांची फारशी गैरसोय होत नाही. यामुळे हिंदी चित्रपट, जाहिराती, पत्रकं वगैरे मराठी माणसांपर्यंत सहज पोचतात. त्यांचा तो स्वीकार करतो आणि आर्थिक व घटनात्मक परिस्थिती त्याला मराठी ऐवजी हिंदीचा उपयोग करायला अधिकाधिक प्रमाणात प्रवृत्त करते.

मराठीच नव्हे तर कोणतीही भारतीय भाषा उच्च शिक्षणाचं व शास्त्रीय अभ्यास

आणि संशोधनाचं माध्यम होण्यात एक फार मोठी अडचण आहे. ती अशी की जगातील माहितीचा व ज्ञानाचा साठा अत्यंत वेगानं वाढत आहे. हा साठा सर्वच नव्हे तर आवश्यक त्या प्रमाणात भारतीय भाषांत उपलब्ध झाल्याशिवाय त्यातून उच्च शिक्षण घेणं व संशोधन करणं अवघड आहे. पण तसं करणं ही अत्यंत खर्चाची गोष्ट आहे. शिवाय त्या साठी कार्यक्रम यंत्रणा निर्माण करायला हवी. सध्या तर या दोन्ही गोष्टी महाराष्ट्र सरकारच्या व विद्यापीठाच्या आवाक्याबाहेरच्या आहेत असं दिसतं. शिवाय या संशोधनाला जगात मान्यता मिळायची असेल तर ते पुन्हा इंग्रजीतूनच जगापुढे ठेवावं लागेल. केवळ मराठीत किंवा अन्य एखाद्या भारतीय भाषेत लिहून जागतिक मान्यता मिळत नाही. रियासतकार सरदेसाई अगर राजवाडे यांच्यासारख्यांचे अत्यंत दर्जेदार लेखन केवळ मराठीत असल्यामुळे त्यांना जगातच नव्हे तर भारतातही मान्यता मिळाली नाही.

बंगाली अगर तमिळ भाषकांना आपापल्या भाषांचा जसा कडवा अभिमान आहे तसा मराठी भाषकांना असता तर परिस्थिती अन्य प्रकारे प्रतिकूल असूनही मराठी भाषेला महाराष्ट्रात तरी आपलं स्थान व प्रतिष्ठा टिकवता आली असती पण दुर्दैवानं संयुक्त महाराष्ट्राच्या चळवळीत उफाळून आलेला तो अभिमान नंतर लुप्त झाला आणि तसं व्हायला आमच्या राजकीय पुढाऱ्यांनी आणि तथाकथित विचारवंतांनी दुर्दैवानं बराच हातभार लावला. त्यामुळे महाराष्ट्रात मराठी भाषेची अत्यंत दयनीय अवस्था झाली आहे.

सत्य परिस्थितीच्यावर केलेल्या विश्लेषणातून पुढील निष्कर्ष निघतात.

केवळ मराठी भाषेतून शिक्षण घेऊन आणि व्यवहार करून आपलं चालणार नाही. प्रत्येक मराठी माणसानं द्विभाषिक असणं आवश्यक व अपरिहार्य आहे. ह्या दुसऱ्या भाषेला आपल्या जीवनात व शिक्षणात फारसं दुय्यम अगर जुजबी स्थान देऊन आपलं भागणार नाही. मराठी इतकंच महत्त्वाचं स्थान या दुसऱ्या भाषेला द्यायला हवं.

ही दुसरी भाषा इंग्रजी अगर हिंदी असू शकेल. खरं म्हणजे या दोन्ही भाषा मराठी माणसाला चांगल्या प्रकारे येणं आवश्यक आहे. मात्र या दोहोंपैकी कोणत्या भाषेला मराठी इतकंच महत्त्वाचं आणि कोणत्या भाषेला दुय्यम स्थान द्यायचं ते आपल्याला ठरवता येईल. माझ्या मते इंग्रजीला अधिक महत्त्वाचं स्थान देणं आपल्या हिताचं आहे. कारण एक तर इंग्रजीचा उपयोग भारतातील इतर प्रदेशांशीच नव्हे तर जगातल्या अन्य देशांशी देखील करायच्या व्यवहारात करता येईल. दुसरी गोष्ट अशी

की इंग्रजीत जितकं प्रचंड ज्ञानभांडार आहे तेवढं हिंदीत नाही. तिसरं म्हणजे आंतरराष्ट्रीय मान्यता मिळविण्यास इंग्रजी जितकी उपयोगी पडेल तितकी हिंदी पडणार नाही आणि चौथी गोष्ट अशी की मराठीची आपल्या जीवनातली जागा घेणं हिंदी भाषेला जितकं सुलभ आहे. तितकं इंग्रजी भाषेला नाही. शिवाय महाराष्ट्राचा हिंदी भाषक प्रदेशात समावेश करायचा अशी प्रवृत्ती काही हिंदी भाषकांत आढळते आणि मराठीच्या हिताच्या दृष्टीनं ती रोखणं आवश्यक आहे.

मराठी व इंग्रजी या भाषांना जर आपल्या नित्याच्या व्यवहारात समान स्थान द्यायचं असेल तर शिक्षणात देखील तसंच समान स्थान असायला हवं. विद्यार्थ्यांना दोन्ही भाषांत समान प्रावीण्य प्राप्त व्हायला हवं.

राज्यं भाषिक तत्त्वावर निर्माण करण्यात आली आहेत हे एकदा मान्य केलं की त्या भाषकांचा त्या राज्यांवर विशेष अधिकार आहे हे तत्त्वत: मान्य करायला हवं. मग कोणत्याही राज्यात प्रवेश करणाऱ्या अन्य भाषकांवर एक तर काही निर्बंध घालावे लागतील किंवा त्या अन्य भाषकांनी त्या राज्यातील भाषेचा स्वीकार करावा अशी व्यवस्था करावी लागेल. नाहीतर महाराष्ट्र, कर्नाटक, गुजराथ, पंजाब इत्यादी प्रगत राज्यं भाषिक राज्यं न राहाता खिचडी राज्यं होतील.

हा प्रश्न गुंतागुंतीचा व प्रक्षोभक आहे. म्हणून सर्व राज्यांनी एकत्र बसून यार प्रश्नावर सर्वमान्य असा तोडगा काढायला हवा. घिसाडघाई करून हा प्रश्न सोडवणं इष्ट नाही. पण त्याबरोबरच आहे ही परिस्थिती समाधानकारक नाही हे देखील ठामपणे नमूद करायला हवं.

आज सर्व देशभर पालक आपल्या मुलांना वाढत्या प्रमाणात इंग्रजी माध्यमाच्या शाळात घालत आहेत. कर्नाटक, केरळ, गोवा, गुजरात इत्यादी अनेक राज्यांतल्या साहित्यिकांनी माझ्या समक्ष जाहीर भाषणात या बाबतीत चिंता व्यक्त केली आहे. याला कारणे दोन. एक तर नोकरीधंद्यात यश मिळविण्यासाठी इंग्रजी शिक्षण हे खूपच अधिक फायदेशीर ठरतं. दुसरं म्हणजे मराठी अगर कानडी माध्यमाच्या शाळांतून इंग्रजीचं आवश्यक तितकं चांगलं शिक्षण मिळत नाही.

ही परिस्थिती बदलण्यासाठी वर सांगितल्याप्रमाणे शिक्षणक्रमात इंग्रजी व मराठी अगर कानडी भाषांना समान महत्त्व दिलं पाहिजे. दुसरं म्हणजे मराठी अगर कानडी इत्यादी भाषांतील शिक्षणाचा घसरलेला दर्जा इंग्रजी माध्यमाच्या शाळांच्या दर्जा इतकाच सुधारला पाहिजे. खरं म्हणजे मी शालेय शिक्षण घेत होतो तेव्हा अशीच परिस्थिती होती आणि आम्ही मराठी-इंग्रजी माध्यमांच्या शाळांतील मुलं केवळ इंग्रजी माध्यमांच्या





अनुक्रमणिका

शाळांतील मुलांपेक्षा कोणत्याही बाबतीत कमी नव्हतो. उलट वरचढ होतो. पुढे कॉलेजात गेल्यावर इंग्रजीत देखील इंग्रजी माध्यमाच्या शाळांतील मुलांपेक्षा आम्ही अधिक मार्क मिळवत असू. आज परिस्थिती बदलली आहे याचं कारण म्हणजे मराठी माध्यमाच्या शाळांत इंग्रजी पुरेसं शिकवत नाहीत आणि या शाळांतील शिक्षणाची अत्यंत आबाळ झाली आहे. शिक्षणाचा दर्जा पार घसरला आहे.

आज महाराष्ट्रात यशस्वी व्हायचं तर इंग्रजी भाषेवर प्रभुत्व असणं आवश्यक आहे. पण मराठी भाषा नाही आली तरी अडत नाही. ही परिस्थिती पालटली पाहिजे. मराठी भाषेचा वापर अनेक क्षेत्रांत होईल अशी व्यवस्था केली पाहिजे. न्यायालयात मराठीचा वापर नित्य झाला पाहिजे. अपवादात्मक परिस्थितीतच इंग्रजीचा अगर हिंदीचा वापर करण्याची मुभा असावी. राज्य सरकारचेच नव्हे तर केंद्र सरकारचे देखील राज्यातील सर्व व्यवहार केवळ मराठीत किंवा मराठी-इंग्रजीत झाले पाहिजेत. तोच नियम अखिल भारतीय पातळीवर काम करणाऱ्या संस्थांना लागू केला पाहिजे. केवळ इंग्रजी भाषेचा उपयोग करून चालणार नाही, असं त्यांना स्पष्ट केलं पाहिजे. हल्ली हिंदीचा वापर व्हावा म्हणून सर्व मोठमोठ्या सरकारी संस्थांत हिंदी अधिकारी नेमले जातात व ते आग्रहपूर्वक हिंदीचा उपयोग करायला भाग पाडतात. विमा, बँकिंग इत्यादी क्षेत्रांतही हे चालतं. यामुळे खर्च वाढतो पण तो त्या संस्थांना करावा लागतो. सर्व सरकारी संस्थांत महाराष्ट्रात मराठी अधिकारी नेमले पाहिजेत आणि त्यांनी मराठीचा वापर करण्याबाबत आग्रह धरला पाहिजे. आयुर्विमा निगम अगर प्राप्तिकर कार्यालय यांच्याशी मला मराठीत पत्रव्यवहार करता आला पाहिजे व मराठीतच मला उत्तरे मिळाली पाहिजेत.

माझी ही भूमिका दुराग्रही अगर अतिरेकी आहे अशी टीका अनेकजण करतील. मराठी भाषेचे अभिमानी देखील त्या टीकेत सामील होतील. पण माझी भूमिका अत्यंत तर्कशुद्ध आहे. जर्मनीत सर्व व्यवहार जर्मन भाषेत होतात. कोका कोला कंपनी देखील आपली जाहिरात व व्यवहार जर्मन भाषेत करते. मग जर्मनीएवढ्या महाराष्ट्रात मराठी भाषेचा वापर करणं का शक्य होऊ नये अगर परवडू नये?

असं करावं असा माझा आग्रह मुळीच नाही. देशाच्या एकात्मतेसाठी सर्व देशभर हिंदीचा अगर इंग्रजीचा वापर करण्यास प्रत्यवाय नसावा असं म्हणायचं असेल तर अवश्य म्हणावं. पण मग मराठी भाषेच्या आजच्या स्थितीबद्दल अश्रू ढाळणं अगर सात्त्विक संताप व्यक्त करणं अर्थशून्य आहे व मूर्खपणाचं किंवा भोंदूपणाचं आहे हे मान्य करायला हवं.

परदेशातल्या लोकांच्या अडचणींचा फार बाऊ करण्यातही अर्थ नाही. भारतात इंग्रजी सर्वत्र समजते. उलट चीनमध्ये अगर फ्रान्समध्ये इंग्रजीचा वापर फारच अल्प प्रमाणात होतो. पण तरी भारतात येतात त्याहून कितीतरी अधिक पर्यटक चीनमध्ये अगर फ्रान्समध्ये जातात.

या व अशाच अनेक गोष्टी करायच्या म्हणजे आपल्या घटनेत व शासकीय व्यवस्थेत खूपच बदल करायला हवेत. एक म्हणजे आपल्या घटनेत ज्या दुरुस्त्या करून राज्य सरकारचे अधिकार कमी करून केंद्र सरकारचे वाढवण्यात आले आहेत, त्या रद्द करायला हव्यात. त्याचप्रमाणे आर्थिक नियोजन व समाजवाद यांच्या नावाखाली केंद्र सरकारने राज्य सरकारांचे जे अनेक अधिकार बळकावले आहेत. ते पुन्हा राज्य सरकारांच्या हाती द्यायला हवेत. काही विशिष्ट कारणं देऊन राज्य सरकारे बरखास्त करायचा जो अधिकार केंद्र सरकारला आहे, त्याचा फार मोठ्या प्रमाणावर दुरुपयोग करण्यात आला आहे. हा अधिकार मन मानेल तसा वापरण्यास बंदी केली पाहिजे. तसेच या अधिकाराच्या वापरास सर्वोच्च न्यायालयात आव्हान देण्याचा अधिकार संबंधित राज्य सरकारला दिला पाहिजे. बँका अगर विमा कंपन्या केवळ केंद्र सरकारलाच काढता याव्यात हे योग्य नाही. राज्य सरकारलाही त्या काढता याव्यात. तसंच केंद्र व राज्ये यांत महसुली उत्पन्नाची वाटणी अधिक न्याय्य प्रकारे झाली पाहिजे. रिझर्व बँकेकडून मन मानेल तेवढी कर्जं काढायचा अधिकार केंद्र सरकारला असता कामा नये. त्यावर काही रास्त निर्बंध विचारपूर्वक बसवले पाहिजेत. त्याचप्रमाणे अखिल भारतीय शासकीय व अन्य सेवांतील व केंद्रीय प्रकल्पातील अधिकाऱ्यांच्या देशातल्या निरनिराळ्या भागांत नेमणुका व बदल्या करताना काही पथ्ये पाळण्याचं बंधन केंद्र सरकारवर घातलं पाहिजे. आजही काही पथ्यं पाळावी लागतातच. त्यात भर घालावी लागते. उदाहरणार्थ मुंबईत जर फर्टिलायझर कॉर्पोरेशन खत कारखाना करणार असेल तर त्यातले निम्मे तरी वरिष्ठ अधिकारी मराठी भाषक असावेत. अशी व्यवस्था हवी.

यासाठी घटनेत व कायद्यात बदल करावे लागतील. सुदैवानं आज तरी ते काही अशक्य नाही. या देशात प्रादेशिक पक्ष व त्यांची ताकद वाढत आहे. या पक्षांच्या सहकार्याशिवाय कोणत्याही अखिल भारतीय पक्षाला केंद्रात राज्य करणं अशक्य झालं आहे. तेव्हा घटनेत, कायद्यात, केंद्र शासनाच्या कार्य पद्धतीत आणि मनोवृत्तीत बदल करण्यास अत्यंत अनुकूल परिस्थिती निर्माण झाली आहे. तिचा कौशल्यानं व समंजसपणानं उपयोग केला तर देशाच्या एकतेला तडा जाऊ न देता मोठ्या प्रमाणावर विकेंद्रीकरण करता येईल व प्रादेशिक भाषांना व अस्मितेला राष्ट्राच्या जीवनात न्याय्य

व योग्य स्थान देता येईल.

अखेर पुन्हा एकदा सांगतो की या सगळ्या गोष्टी कराव्यात असा माझा आग्रह नाही. पण प्रादेशिक भाषा जगायच्या असतील व त्यांचा विकास व्हायचा असेल तर त्या करायला हव्यात इतकंच माझं म्हणणं आहे. तसंच या गोष्टी करणं आज राजकीय दृष्ट्या शक्य आणि शासकीय व आर्थिक दृष्ट्या व्यवहार्य आहे. असंही मला म्हणायचं आहे आणि त्या केल्यामुळे देशाच्या एकात्मततेला तडा जाण्याचं काही कारण नाही असाही मला विश्वास वाटतो.

□□□

**४ अभंग,साहित्य सहवास, वांद्रे (पूर्व)**
**मुंबई ४०००४१**

---

*(एकाहत्तराव्या अखिल भारतीय मराठी साहित्य संमेलनाला शुक्रवारी २४ एप्रिल १९९८ रोजी प्रारंभ झाला. संमेलनाचे अध्यक्ष* ***प्रा. द. मा. मिरासदार*** *यांच्या अध्यक्षीय भाषणातील मातृभाषेसंबंधीचा विचार पुढे दिला आहे - संपादक)*

''साहित्य संमेलन हा मातृभाषेचा महोत्सव आहे, पण समाजातील एक महत्त्वाची सांस्कृतिक घटना आहे. सांस्कृतिक चळवळीतला तो एक महत्त्वाचा टप्पा आहे. म्हणून अशा संमेलनाची परंपरा अखंडपणे चालूच राहिली पाहिजे. शेवटी आपल्या मराठी भाषेचे त्यातच हित आणि वैभव आहे.

आज खरी आवश्यकता आहे ती मराठी माणसाची मानसिकता बदलण्याची. आमच्या मातृभाषेबद्दल आम्हालाच खरेखुरे प्रेम आणि जिव्हाळा नाही. आमच्या भाषेसंबंधी आम्हालाच न्यूनगंड आहे. आमच्या मुंबईतला मराठी माणूस हा इतरांशी बाहेर हिंदीत किंवा इंग्रजीत संभाषण करतो. आपण मराठीतून बोललो तर समोरच्या माणसाला ते समजणार नाही असे आम्हाला वाटत असते. शाळा किंवा महाविद्यालय असो, किंवा खासगी संस्था असो- तेथे उपस्थितीपटावरील आमची स्वाक्षरी-नुसती आद्याक्षरे-पण तीसुद्धा इंग्रजीत! माझ्या महाविद्यालयातील उपस्थितीपटावर सर्व प्राध्यापक मित्रांची आद्याक्षरे इंग्रजीत, हे मी डोळ्यांनी पाहिले आहे आणि सर्वत्र हीच स्थिती. सुशिक्षित घरातले आम्ही एकमेकांना पत्र लिहिणार तीसुद्धा अनेकदा इंग्रजीत. फार काय बारसे, मुंज, लग्न, विवाहाचा वाढदिवस यांसारख्या आमच्या कार्यक्रमांची निमंत्रणपत्रिकासुद्धा शुद्ध इंग्रजीत. 'गुडमॉर्निंग', 'गुडनाईट', 'थँक यू' हे शिष्टाचाराचे शब्द तर जणू मराठीच झाले आहेत. हे सर्व कशासाठी? आपल्या मातृभाषेतून सर्व व्यवहार करणे आम्हाला कमीपणाचे, गावंढळपणाचे वाटते काय? हा न्यूनगंड नव्हे तर काय आहे? म्हणून मराठी माणसाची मानसिकताच बदलण्याची खरी गरज आहे.

आम्ही मराठी माणसेच आमच्या मातृभाषेचे खरे शत्रू आहोत. दुसऱ्याला दोष कशासाठी द्यायचा? पन्नास वर्षांपूर्वी आम्ही आमची राजकीय गुलामगिरी संपविली; पण तिच्यापेक्षाही वाईट असलेली सांस्कृतिक गुलामगिरी मात्र भूषण म्हणून मिरवीत आहोत.''

# अनुवाद : एक कला

**लीना सोहोनी**

लवकरच मेहता पब्लिशिंग हाऊसतर्फे माझं 'विद्रोह' हे पहिलं अनुवादित पुस्तक प्रकाशित होत आहे. या पुस्तकाची एक तयार झालेली प्रत मला नुकतीच पाहायला मिळाली. आपलं पहिलं- वहिलं अपत्य नीटनेटकं न्हाऊमाखू घालून, अंगडं टोपडं घालून कुणी आपल्या हाती आणून दिल्यावर एखाद्या पहिलटकरणीला जसा आनंद होईल ना, अगदी तसाच आनंद मला झाला. ते पहिलं-वहिलं साहित्यिक अपत्य जन्माला येताना ज्या ज्या काय अडचणी आल्या त्या आठवल्या आणि त्याचं नेटकं रूप पाहिल्यावर त्या श्रमांचं सार्थकही झाल्यासारखं वाटलं.

अर्थात एखादी कलाकृती स्वतः निर्माण करणं आणि एखाद्या परकीय साहित्यकृतीचं भाषांतर, रूपांतर किंवा स्वैर अनुवाद करणं हे दोन्ही सारखंच आहे असं म्हणण्याचं धाडस मी करणार नाही. परंतु तरीही एखाद्या पुस्तकाचा अनुवाद करता येणं ही सुद्धा एक कलाच आहे असं मी मानते. त्यासाठी भाषांतरकाराला ज्या भाषेतून अनुवाद करायचा त्याची पुरेशी जाण असावी लागते, त्यातील खाचाखोचांची माहिती असावी लागते. इतकंच नव्हे तर ती भाषा ज्या संस्कृतीतून उदयाला आली त्या संस्कृतीची, ती भाषा बोलणाऱ्या लोकांची, त्यांच्या राहणीची, विचारसरणीची थोडीफार ओळख असावी लागते आणि सगळ्यांत महत्त्वाचं म्हणजे ज्या भाषेत हा अनुवाद केला जातो, त्या भाषेवर तर चांगलंच प्रभुत्व लागतं. ती भाषा अगदी हाडीमाशी खिळलेली असावी लागते म्हटलं तरी चालेल. आणि मगच तो अनुवाद हा कृत्रिम न वाटता स्वाभाविक, नैसर्गिक वाटतो.

आता वर सांगितल्याप्रमाणे मी सुप्रसिद्ध अमेरिकन लेखक Henry Denker याच्या 'Outrage' या पुस्तकाचा अनुवाद केला. (जो लवकरच 'विद्रोह' या नावाने प्रसिद्ध होत आहे.) तेव्हा बऱ्याच ओळखीच्या माणसांनी मला असं विचारलं, की तू याच पुस्तकाचा अनुवाद का केलास? तू एवढी जर्मन भाषा शिकलेली आहेस तर एखाद्या जर्मन पुस्तकाचा अनुवाद का नाही केलास? याचं साधं सोपं व प्रामाणिक उत्तर असं की मी आता आपण अमूक एक पुस्तकाचा अनुवाद करायचा म्हणून ठरवून केलेला नाही. तो अचानक मला करावासा वाटला आणि





अनुक्रमणिका

मी केला.

अर्थात या पाठीमागेही काही कारणं आहेत. मला मुळातून साहित्याची आवड होतीच. शाळा, महाविद्यालय आणि नंतर विद्यापीठात आपल्या लेखणीचे थोडेफार प्रयोग मी केले होते. त्यात हा अनुवाद-प्रकारही मी हाताळला होता आणि कथा, कविता, स्फुट लेख, लघुनिबंध या सगळ्यांपेक्षा आपल्या परकीय - जर्मन व इंग्रजी साहित्याचा (कथा व कादंबऱ्या) अनुवाद जास्त सहजतेने जमतो व त्यात जास्त आनंद मिळतो हे लक्षात आलं होतं. तेव्हाच, आत्ता नाही पण पुढे कधीतरी, सवड मिळाल्यानंतर या प्रकाराशी जवळीक करायची असं मी मनाशी ठरवून ठेवलंच होतं.

मग यथावकाश जर्मन साहित्य हा विषय घेऊन पुणे विद्यापीठातून एम.ए. झाले. संसार, बालसंगोपन यांत गुरफटून गेले. बोलबोलता चांगली पाच-सहा वर्षे यांतच संपून गेली. अर्थात वाचनाचं वेड असल्याने ते एकीकडे चालूच होतं. मधेच कधीतरी एखादं चांगलं पुस्तक हातात पडायचं. चार दिवस झपाटल्यासारखं व्हायचं. आपणही काहीतरी लिहावं अशी सुरसुरी यायची. पण मला वाटतं ती पुरेशी नसावी. कारण ते वाटणं तिथेच थांबायचं. हातून पुढे काहीच व्हायचं नाही.

असं करता करता रस्त्यात एक दिवस अचानक जुन्या प्राध्यापिका भेटल्या. त्यांनी सहजच विचारलं, ''काय गं? सध्या काय उद्योग?'' त्यावर ''काही नाही. मुलं लहान आहेत'' वगैरे सबबी सांगून मी निसटले खरी पण ती गोष्ट मनातू काही केल्या जाईना. आपण खरंच कोण आहोत? अमक्याची पत्नी, तमक्याची आई, तमक्याची सून यापलीकडे आपली काय ओळख? घराच्या चौकटीबाहे आपलं काय अस्तित्व? आपण का नाही आपलं व्यक्तिमत्त्व जोपासलं? का नाह अंगच्या गुणांचा विकास केला? असे अनेक प्रश्न भेडसावयाला लागले. खू अपराधी वाटलं. पण या प्रश्नांना उत्तर म्हणून नोकरी करावी, अर्थार्जन करावं असं वाटेना. नुसतं काहीतरी करावं असं मात्र मनापासून वाटत होतं. मग मना पहिला विचार आला तो लेखनाचा. कुठल्यातरी मार्गाने साहित्यसेवा जरूर करायच असं मी ठरवलं.

तशातच एक दिवस **Henry Denker** चं **'Outrage'** हे पुस्तक हात आलं. ते वाचलं आणि त्यानं मला जणू झपाटूनच टाकलं. वेडं केलं. भ्रष्ट आणि

आंधळ्या न्यायव्यवस्थेला शासन म्हणून खऱ्या अपराध्याला स्वतःच मृत्युदंड देणारा एक सामान्य माणूस, आणि त्याला न्याय मिळवून देण्यासाठी त्या दोषी न्यायव्यवस्थेलाच न्यायालयात खेचणारा तरुण जिद्दी वकील यांच्या विद्रोहाची ही कहाणी आहे. ही कहाणी जशी अमेरिकेत खरी, तशीच पृथ्वीतलावर कुठेही खरी आहे. तुम्हा-आम्हा सर्वांच्या जीवनात कधी ना कधी ती घडणं सहज शक्य आहे. त्यामुळे हे पुस्तक मराठी रसिकांपुढे आणून हजर करायचंच असं मी ठरवलं.

अर्थात एखादी गोष्ट ठरवणं आणि ती प्रत्यक्षात उतरवणं यांत फार फरक आहे. त्यामुळे जर आपल्याला याचा अनुवाद करायचा असला तर तो जमेल की नाही असा विचार करून ते परत एकदा वाचलं. मग जी बैठक मांडली ती तहानभूक विसरून पहिल्याच दिवशी दहा पानं संपवली. मात्र एक ठरवलं होतं- सगळं पुस्तक पूर्ण करून होईपर्यंत आधी लिहिलेलं परत वाचायचं नाही.

आधी मनाशी विचार केला होता की ही कादंबरी एखाद्या नामांकित मासिकाकडे द्यायची. क्रमशः छापून आली तरी चालेल. पण प्रत्यक्षात ती पूर्ण झाल्यावर ते मनाला पटेना. या कादंबरीचा वेग, त्याची नाट्यमयता, त्यातला संघर्ष, खटकेबाज संवाद आणि परिपूर्ण व्यक्तिरेखा या सगळ्याचा विचार करता ही कादंबरी एका बैठकीत वाचून पूर्ण करण्याची आहे असं वाटलं.

मग प्रकाशकांकडे खेटे. कादंबरी अनुवादित आहे म्हटल्यावर तर कुणी त्याच्याकडे बघायलाही तयार होईना. अजूनही आपल्याकडे अनुवादाला साहित्य मानायला फारसे लोक तयार नसतात. त्यात माझ्या कपाळावर 'नवोदित' असा शिक्का मारलेला. याआधी पुस्तकरूपाने असं काहीच प्रसिद्ध झालेलं नाही. आता प्रत्येक लेखक हा कधी ना कधी तरी नवोदित असतोच ना! कुणीतरी संधी दिल्याखेरीज तो काही लेखक होत नाही! आणि मग अशी निराशा पदरी आली. रात्र रात्र जागून एकेक शब्द विचारपूर्वक योजून लिहून काढणं, त्यात तहानभूक हरपून जाणं, त्यातल्या पात्रांशी एकरूप होऊन त्यांचे अनुभव आपण स्वतः जगणं हे सगळं व्यर्थ वाटायला लागलं. अशातच कुणीतरी मेहता पब्लिशिंग हाऊसचं नाव सुचवलं. त्यांनी मात्र माझा अनुभव विचारला नाही, वय विचारलं नाही. फक्त हस्तलिखिताचं बाड ठेवून जा, नंतर कळवतो असं सांगितलं. त्यानंतर मी ती गोष्ट विसरूनही गेले. एकदा पुस्तक आपल्या हातातून गेल्यावर ते त्यांच्या कसोटीला उतरतं का

नाही, त्यांना ते छापण्यायोग्य, वाचनीय वाटतं का नाही याचा विचार करायचाच नाही असं मी ठरवलं आणि पुढच्या वाचनाच्या व लघुकथांच्या भाषांतराच्या कामाला लागले. अगदी निष्काम भावनेने. मग काही महिन्यानी त्यांचा निरोप आला, पुस्तक छापतो आहोत. तेव्हा मला काय वाटलं ते शब्दांत सांगता यायचं नाही.

तेव्हा आता या एका छोट्याशा अनुभवावर मी 'अनुवाद' या साहित्य प्रकाराबद्दल माझे चार शब्द लिहिले तर ते फारसं अवाजवी होणार नाही.

अनुवादाची पहिली पायरी म्हणजे वाचन. एखाद्या कादंबरीचा, नाटकाचा किंवा लघुकथेचा स्वैर अनुवाद करायचा झाला तर त्या परकीय भाषेची भाषांतरकाराला चांगली जाण हवी. त्यातील खाचाखोचा, त्यात वापरलेली बोली भाषा, त्या भाषेची संस्कृती याची थोडीफार ओळख हवी आणि हे फारसं अवघड नाही. भाषेची मनापासून आवड असेल तर पुरेशा वाचनानंतर हेही काही अवघड नाही. शिवाय एखाद्या लेखकाचं एखादं पुस्तक जर अनुवादासाठी निवडलं तर त्यापूर्वी त्याच लेखकाची आणखीही थोडी पुस्तके नजरेखालून घालणं जरूरीचं असतं. म्हणजे त्याच्या सवयी, त्याच्या विशिष्ट लेखन पद्धतीची आपल्याला जवळून ओळख होते.

यानंतरची पायरी म्हणजे आकलन. कुठल्याही माणसाला कुठल्याही गोष्टीचं आकलन एका माध्यमातून होतं- ते म्हणजे भाषेच्या माध्यमातून. वाचलेला मजकूर माणसाला साधारणपणे स्वत:च्या मातृभाषेतून किंवा त्याचं शिक्षण ज्या भाषेतून झालं आहे त्या भाषेतून, थोडक्यात जी भाषा त्याची स्वत:ची, आपली आहे त्या भाषेतून समजतो आणि ही आकलनाची प्रक्रिया आपल्या नकळत चालू असते. प्रत्येक माणूस विचार करताना अशा आपल्या हाडीमाशी खिळलेल्या भाषेतून विचार करत असतो. उदा. मराठी भाषक माणूस मराठीतून विचार करतो. बिनभाषेचा विचार करणे कदाचित फक्त साधुसंतांना जमत असेल. पण आपल्यासारख्या सामान्य माणसाच्या मनात जे विचार येतात ते एका विशिष्ट भाषेत येतात. तेव्हा कोणताही मजकूर वाचला की त्याचं आपल्या मनात एक विचाररूपी प्रतिबिंब उठतं. हे प्रतिबिंब आपल्या स्वत:च्या भाषेत उमटतं. हे प्रतिबिंब जास्तीत जास्त चांगल्या व रोचक तऱ्हेने कागदावर उमटवणं, आणि असं उमटवणं, की वाटावं हे दत्तक अपत्य नसून आपलं स्वत:चंच आहे, तर अशा लेखनाला मी अनुवादाची कला

म्हणेन.

ही कला प्रत्येकाला जन्मत: अवगत असेलच असं नाही. पण थोडी साहित्याची आवड आणि थोडे योग्य दिशेने प्रयत्न यांचा समन्वय साधल्यावर तेही फारसं कठीण नाही. याचसाठी पुढची पायरी म्हणजे संदर्भ. एखादी कलाकृती जेव्हा आपण अनुवादासाठी घेतो तेव्हा ती आधी अर्थातच वाचलेली असते. त्यामुळे त्यातील वातावरणाला साजेशी भाषा वापरणं महत्त्वाचं ठरतं. शिवाय प्रत्येकच भाषेला आपापली अंगं असतात. आपापली सौंदर्यस्थळं असतात. कंगोरे असतात. एखाद्या भाषेत एखादा खूप बोलका आणि सूचक शब्द असतो तो तसाच्या तसा दुसऱ्या भाषेत आणता येत नाही. त्या शब्दातून व्यक्त होणारा भाव ओढून आणावा लागतो. शब्दकोशाच्या आधाराने शहाण्या माणसाने अनुवाद करायला जाऊ नये. उदाहरण साधंच आहे - **He died.** आता हे वाक्य मराठीत अनेक तऱ्हांनी लिहिता येईल. तो मेला, वारला, खपला, त्याचा कारभार आटोपला इथपासून तो थेट त्यांचा देहांत झाला, ते स्वर्गवासी झाले, त्यांना वीरमरण आलं इथपर्यंत कुठल्याही तऱ्हेने. आता याचसाठी संदर्भ आवश्यक आहे. एखाद्या गावगुंडाला उद्देशून 'त्यांचा देहांत झाला' हे म्हणणं जितकं अप्रस्तुत आहे, तितकंच एखाद्या थोर नेत्याचा 'तो मेला' असा उल्लेख करणं अयोग्य ठरेल. शिवाय इंग्रजी भाषेत तृतीय पुरुष एकवचनात आदर वगैरे दाखवायची सोयच ठेवलेली नाहीये. त्यामुळे गावगुंड काय किंवा देशाचे राष्ट्राध्यक्ष काय, सगळेच **he** या सदरात मोडतात.

मी अनुवादित केलेल्या 'विद्रोह' या कादंबरीचा नायक बेन गॉर्डन हा तरुण आहे. त्यामुळे त्याचा उल्लेख 'तो' असा करणं मला योग्य वाटलं. त्या कथेतील आरोपी डेनिस रिऑर्डन हा वयाने जरी साठीच्या पुढचा असला तरी तो एक सामान्य माणूस आहे. गरीब आहे. फारसा शिकलेला नाही. त्यामुळे त्याचा उल्लेख मी 'तो' म्हणूनच केला आहे. पण त्या कथेतील न्यायमूर्ती ॲरॉन क्लाईन हे मात्र ज्ञानवृद्ध, वयोवृद्ध आहेत. त्यांचा उल्लेख 'तो म्हणाला,' 'त्याने हातोडी आपटली' असा करणं मला योग्य वाटलं नाही. त्यासाठी मी 'ते' हे सर्वनाम वापरलेलं आहे.

कुठल्याही पाश्चात्त्य कादंबरीचा अनुवाद करताना आपल्याला एक मोठा फरक जाणवतो तो म्हणजे संस्कृतीचा. पाश्चात्त्यांच्या स्त्री-पुरुष संबंधाबद्दलच्या

कल्पना आम्हा भारतीयांपेक्षा खूपच वेगळ्या आहेत. त्यांचं सामाजिक जीवनही पुष्कळच स्वैर आहे. त्यांचं प्रतिबिंब त्यांच्या साहित्यात पडलेलं दिसतं. पण तशा वर्णनात एक सहजता असते. एक मोकळेपणा असतो. आपल्या नीति-अनीतीच्या कल्पनेत न बसणाऱ्या गोष्टी अनेकदा कथेच्या ओघात सहजपणे घडलेल्या दिसतात. अगदी नावाजलेले आणि चांगल्या वरच्या दर्जाचे लेखकसुद्धा स्त्री-पुरुषांच्या शृंगाराची वर्णने तपशीलवार लिहितात. ती त्या भाषेत वाचताना फारशी गैर वाटतही नाहीत. पहिल्या प्रथम धक्का बसला तरी त्याच प्रकारची दहा वर्णनं वाचल्यावर भारतीय भाषेत आणायचं म्हणजे हे आपल्या वाचकांना आपल्या संस्कृतीला पचेल की नाही हे भान ठेवावच लागतं. नाहीतर पुस्तकाला उगीचच सनसनाटी आणि बाजारू स्वरूप येऊन त्यातल्या आशयावर अन्याय होतो. तेव्हा माझ्या मते **He kissed her** या इंग्रजी वाक्याचा- 'त्याने तिचा हात हाती घेतला' असा अनुवाद केला तर ते फारसं वावगं ठरणार नाही आणि त्यानंतरचं वर्णन कथानकात बाधा येत नसेल तर न केलेलंच बरं.

आणखी एक महत्त्वाची गोष्ट इंग्रजीचा मराठीत अनुवाद करताना ध्यानात घेतली पाहिजे. ती म्हणजे आम्हा भारतीयांच्या मनावरचा इंग्रजी भाषेचा पगडा. या देशात इंग्रज दीडशे वर्षे राज्य करत होते आणि ते आपल्या भाषेचा फार मोठा ठसा मागे ठेवून गेले आहेत ही गोष्ट आपल्याला नाकारता येणार नाहीच. इंग्रजी आपली मायबोली नसली तरी मावशीबोली नक्कीच आहे. कितीतरी इंग्रजी शब्द आपण आपलेसे केले आहेत. दैनंदिन व्यवहारात ते आपण वापरतो. ते जवळजवळ मराठीच झाले आहेत. त्यामुळे अनुवाद करताना ते वापरावे लागले तर कचरण्याचं कारण नाही. 'तो टेबलापाशी बसला' हे वाक्य जितकं स्वाभाविक वाटेल तितकं 'तो मेजापाशी बसला' हे वाटणार नाही. बसस्टॉप हा बसस्टॉपच हवा. तो थांबा नको. मोटार ही स्वयंप्रेरिका नको. इंजिनियर हा अभियंता नको.

आणि सर्वांत शेवटचं पण सर्वांत महत्त्वाचं म्हणजे आपण लिहिलेला मजकूर हा आपला वाटला पाहिजे. त्यात सहजता, स्वाभाविकता हवी. त्याला परकीय भाषेचा वास येता कामा नये. प्राधान्य आहे ते अर्थ कायम ठेवण्याला. शब्दाला प्रतिशब्द देण्याला नव्हे. त्यामध्ये भाषेचा बाज राखला गेला पाहिजे. आता हेच उदाहरण पाहा-





अनुक्रमणिका

"Are you out of your mind?" She said. "I can't do that. I'd have you know, Mr. Quinn, I am a Rockcastle preacher's daughter." She was grinning as she said it.

याचा सरळ सोपा अनुवाद असा करता येईल-

''तुला काय वेड बीड तर नाही लागलं?'' ती म्हणाली, ''हे असलं काही केलं तर मला पाप लागेल ना. मी रॉकॅकॅसलच्या धर्मगुरूची मुलगी आहे म्हटलं.'' असं म्हणतानाच ती मिस्किलपणे हसत होती.

याचा अर्थ असा की दिलेल्या प्रत्येक शब्दाचा अनुवाद करायला लागतो असं नाही. एखादं परकीय वाक्य घेऊन त्याला समांतर आपल्या भाषेतलं एखादं वाक्य किंवा वाक्यसमुदाय शोधावा लागतो. स्वैर अनुवाद करताना कधी कधी एखादं मूळ भाषेतलं वाक्य किंवा सबंध परिच्छेदच गाळावा लागतो. तर कधी आशय स्पष्ट होण्यासाठी त्याला स्वतःची पुस्ती जोडावी लागते.

माझा स्वतःचा अनुभव तर असा आहे की कुठल्याही कथेचा किंवा कादंबरीचा अनुवाद केल्यानंतर त्यावर दोन-चार दिवस तसेच जाऊ देणं बरं असतं. त्यानंतर तो वस्तुनिष्ठ दृष्टिकोण ठेवून एकदा परत वाचला की त्यावर कुठे परक्या भाषेची छाप वाटते आहे का, कुठे दुसऱ्या भाषेचा वास येतोय का हे आपलं आपल्याला जाणवतं आणि मग अंतिम मजकूर तयार करताना जर प्रत्येक वाक्य एकदा मनाशी म्हणून बघितलं तर एखाद-दुसऱ्या शब्दाची जागा बदलून, एखाद्या शब्दाला दुसरा पर्याय वापरून, थोडक्यात चांगलं पॉलिश करून मग तो मजकूर परत लिहिला की त्याची भट्टी चांगली जमते.

मी 'विद्रोह' हा अनुवाद सुमारे तीन वर्षांपूर्वी केला. त्यानंतर मी इतर लेखनात व वाचनात गर्क होते. त्यामुळे मी त्याचा विचारही केला नव्हता. त्यानंतर नुकतंच मी हे पुस्तकरूपात वाचल्यावर मला स्वतःलाच त्याच्याकडे त्रयस्थपणे बघताना जाणवलं की हे खरोखरच मराठी वाटतं आहे. याला कुठेही इंग्रजीचा वास येत नाही.

म्हणजेच थोडक्यात अनुवाद करताना शक्यतो आपल्याला मनापासून पटलेला, आपल्या जिव्हाळ्याचा विषय घ्यावा. आपल्याला मनापासून भावलेली साहित्यकृती घ्यावी. पण त्याचबरोबर ती आपल्या लेखणीला झेपणारी असावी. नाहीतर मूळ साहित्यकृतीवर अन्याय केल्यासारखंच होईल. ते पुस्तक चांगलं दोन-तीन वेळा

वाचून आपल्या मनात झिरपू द्यावं. म्हणजे त्यातील पात्रांशी (इथे मी फक्त कथा, कादंबरी, नाटक एवढ्या पुरतंच बोलते आहे.) आपण समरस होतो. त्यांच्या जगाची व त्यातल्या वातावरणाची आपल्याला ओळख होते. त्यांच्याशी जवळीक होते. नातं निर्माण होतं व ती परकी वाटेनाशी होतात; मग त्यांचे विचार हे आपले विचार होतात. ते आपण आपल्या भाषेत नीट व्यक्त करू शकतो. अशा प्रकारे त्या कलाकृतीचा अनुवाद करण्याची मानसिक तयारी पूर्ण झाली की मगच अनुवादाच्या कामाला सुरुवात करायला हवी.

या स्वैर अनुवादाचंच जरा मोठं भावंड म्हणजे रूपांतर. पण हा प्रकार हाताळायला जरा अवघड आहे. कारण यात मूळ कथानक तेच असतं. प्रसंग व पात्र बरेचदा तशीच असतात. पण ती आपल्या भाषेतली नावं, गावं आणि वेशभूषा करून आलेली असतात. पण हे करत असताना ती कथावस्तू परकीय भाषेतून उसनी आणली आहे असं न वाटता ती आपल्याच मातीतून उगवली आहे. अशा रीतीने तिची नोंदणी करणं महा कर्मकठीण काम आहे. 'ती फुलराणी' किंवा 'तीन पैशाचा तमाशा' सगळ्यांनाच साधतो असं नाही. आपण मूळ अस्सल कलाकृतीचं हास्यास्पद सोंग करणार नाही अशी ज्याला खात्री असेल त्यानेच या वाटेला गेलेलं बरं. नाहीतर अँडीचा आनंदा होतो, बॉबचा बाबूराव आणि हॉलीवूडची मुंबापुरी! आणि मग ते केविलवाणं रूप बघून वाचकांनाच रडायची पाळी येते.

आणि त्या पुढचा प्रकार म्हणजे वाङ्मय-चौर्याचा. एखादी परकीय कथा नाहीतर कादंबरी नावं आणि थोडेफार प्रसंग इकडचे तिकडे करून बिनदिक्कत आपलीच म्हणून खपवणारे महाभागही थोडे नसतात. पण अशांविषयी न बोललेलंच बरं.

खरोखरच साहित्यसेवा करायची इच्छा असेल, भाषेची पुरेशी जाण आणि लेखनाची थोडीफार हातोटी असेल तर हा स्वैर अनुवाद प्रकार कुणालाही जमण्यासारखा आहे. जगातल्या निरनिराळ्या भाषांमधील साहित्य आपल्या वाचकांमुळे ठेवून त्यांना ज्ञान आणि मनोरंजनाचे नवे नवे दरवाजे खुले करून देणं हेही कमी महत्त्वाचं नाही.

□□□

**बिल्डिंग क्र. २, ब्लॉक जी ०१,धनश्री पॅराडाइस**
**इन्कमॅटक्स ऑफिसजवळ, ताराबाई पार्क**
**कोल्हापूर ४१६००३**

# नाते अक्षरांशी

मृणालिनी शहा

अक्षरांशी नाते जोडणारे प्रभाकर जोगदंड

ध्वनिरूप भाषेला लिपिबद्ध करण्याची कला माणसाने फार प्राचीन काळापासून प्राप्त केली आहे. छापखान्याचा शोध लागण्यापूर्वी ग्रंथ हस्तलिखित स्वरूपात असत. आता प्राचीन शिलालेख, मध्ययुगीन पोथ्या व ऐतिहासिक पत्रे हस्तलिखित रूपात दिसतात. कोणताही ललित किंवा वैचारिक ग्रंथ, लेख मुद्रित होण्यापूर्वी त्या त्या लेखकाच्या हस्तलिखितात असतो. कवी किंवा लेखक यांच्या हस्तलिखिताचे कौतुक व अप्रूप, काही रसिकांना वाटते पण एरवी हस्तलिखित ग्रंथाचा आणि आपला संबंध फारसा येत नाही.

संगणकाच्या या युगात तंत्रज्ञानाच्या प्रगतीने झेरॉक्स, डी.टी.पी. आणि ऑफसेट प्रिंटिंगमुळे मुद्रण व्यवसायात कमालीची क्रांती घडून आली आहे. ऑफसेट प्रिटिंगमुळे; एखादा ग्रंथ हस्तलिखित रूपातच छापला जाऊ शकत नाही व तो वैशिष्ट्यपूर्णही ठरू शकतो. 'नामदेवाची गाथा' हा छोटेखानी ग्रंथ जेव्हा आळंदीच्या साहित्य संमेलनात (१९९६) प्रसिद्ध झाला तेव्हा तो ग्रंथ कुतूहलाचा विषय झाला होता. नामदेवांचे 'समाधीचे अभंग' या ग्रंथात अक्षरांकित केले आहेत प्रभाकर जोगदंड यांनी. स्वतः लेखक किंवा निर्मितिशील कलावंत नसतानाही अक्षरांशी एक वेगळे नाते जोडणाऱ्या या व्यक्तीची ओळख करून घ्यावीशी वाटते.

गेली पंचवीस वर्षे हस्तलिखिताचा छंद प्रभाकर जोगदंडांनी जोपासला आहे. १९८६ साली तारखात्यातून निवृत्त झाल्यानंतर सध्या त्यांचा हाच पूर्णवेळ व्यवसाय आहे. त्यांना लहानपणापासून चित्रकलेची आवड होती पण रीतसर कलाशिक्षण काही ते घेऊ शकले नाहीत. काही चित्रे व रेखाटने प्रसिद्ध झाली असली तरी त्यात ते फारशी प्रगती करू शकले नाहीत. पण लहानपणापासून त्यांचे हस्ताक्षर उत्तम होते. अक्षरांना सुबकपणा आणण्यासाठी लहानपणी त्यांनी कित्ता गिरवला होता. आपल्या हस्ताक्षराचा छंद पुढे त्यांनी जोपासला व विकसित केला. ते गेली कित्येक वर्षे विविध

मान्यवर लेखकांच्या नव्या पुस्तकांच्या मुद्रणप्रती करून देतात. त्याबरोबरच विविध हस्तलिखिते, स्मरणिका, निबंध, अहवाल, प्रबंध इत्यादी लेखन देखण्या हस्ताक्षरात अक्षरांकित करून देतात. आतापर्यंतचा त्यांचा लेखन प्रपंच सुमारे ५० हजार छापील पृष्ठांच्यावर असावा. त्यात कथा, कविता, कादंबरी, नाटक इत्यादी विविध वाङ्मय आहे. मुद्रणप्रत करून दिलेल्या लेखकांत ह. वि. मोटे, द. ग. गोडसे, जयवंत दळवी, वसंत बापट, व. दि. कुलकर्णी, जी. ए. कुलकर्णी, आनंद साधले, विश्राम बेडेकर इत्यादी अनेक लेखक आहेत. याशिवाय नाट्यदर्पणचे विशेषांक जोगदंडांच्या हस्ताक्षरात प्रसिद्ध झाले आहेत.

पुस्तकनिर्मितीत मुद्रणप्रत बनवणारा फार महत्त्वाचा ठरतो हे नामवंत प्रकाशकांनी अनेक वेळा कबूल केले आहे. जोगदंडांच्या मते प्रुफरीडर, बाइंडर, कंपोझिटर या सर्वांचा सहभाग पुस्तकनिर्मितीत मोलाचा असतो. आपले हे मत त्यांनी आग्रहाने प्रतिपादले आहे. त्याची प्रतिक्रिया म्हणून दूरदर्शनवरील ''शरदाचे चांदणे'' च्या एका कार्यक्रमात अशोक कोठावळे आणि रत्नाकर मतकरी यांच्याबरोबर प्रभाकर जोगदंड यांनाही सहभागी करून घेतले होते.

काहीजण त्यांना अक्षरशिल्पी म्हणतात तर श्री. द. ग. गोडसे यांनी तर त्यांना अक्षरश्रीमंत ही पदवी दिली होती.

हस्ताक्षरांशी नाते जोडणाऱ्या या कलाकाराची लेखनप्रत वाचण्याची पद्धत निराळी आहे. मुद्रणप्रत करताना ते आधी लेखकाचे लेखन वाचत नाहीत तर ते चाळून त्या लेखकाची लिहिण्याची पद्धत पाहतात. विशेषतः ''म'' आणि ''र'' यांसारखी अक्षरे किंवा मात्रा, वेलांट्या आणि उकार लिहिण्याची पद्धत पाहतात. त्यांचा अभ्यास करतात आणि नंतर नक्कल करायला घेतात. प्रभाकररावांचे अक्षर काही पृष्ठांनंतरही बदलत नाही. सतत एका पद्धतीने सुंदर, टपोरे सुवाच्य लेखन करणे यात त्यांचा हातखंडा आहे.

**शुद्धलेखनाबाबतही त्यांचा कटाक्ष आहे.**

सतत आठ-दहा तास लिहिणे कंटाळवाणे व कष्टाचे काम आहे. पण एकदा व्यवसाय म्हणून जाणीवपूर्वक निवड केल्यावर त्यांना या कामात आनंद वाटतो. काम

करताना ताजेपणा वाटावा म्हणून तीन-चार मुद्रणप्रतींचे काम ते आलटून पालटून करतात. त्यांची ही साधना पाहताना रामदासांच्या उत्तम हस्ताक्षरांच्या समासाची आठवण होते.

मुद्रणप्रत तयार करण्याच्या व्यवसायात त्यांना इतके लेखन करायचे आहे की जे आत्तापर्यंत कुणीही केले नाही व पुढेही कोणी करणार नाही. त्यांच्या या जिद्दी संकल्पाला शुभेच्छा देणे हे प्रत्येक भाषाप्रेमीचे कर्तव्य आहे. नाही का? (या अक्षर श्रीमंताचा पत्ता आहे - प्रभाकर जोगदंड ओम प्रिया सोसायटी, मांडा, टिटवाळा (पश्चिम) - संपादक)

□□□

**१, शीतल अपार्टमेंटस् ४६/४ एरंडवणा,**
**पुणे-४११००४.**

---

## वोथंबा आणि षट्क

संदर्भ : भाषा आणि जीवन, पावसाळा १९९७, पृष्ठ ६७ आणि दिवाळी १९९७ पृष्ठ ५० मराठीत "over' (क्रिकेटमधली) यासाठी षट्क हा उत्कृष्ट पर्याय आहे असे म्हणणाऱ्यांनी तो ''धावत्या समालोचनाच्या'' ष्टायलीत उच्चारून बघावा. कारण काहीही केले तरी (तुम्ही प्रा. मंगरुळकर नसलात तर) त्याचा उच्चार ''शट-क'' असाच येतो हे मनात घोळत असताना पावसाळ्ला १९९७ चा अंक वाचला आणि तिथे ''अंपायर'' ला मात्र एक सुंदर शब्द आढळला : वोथंबा!

''अंपायर'' हा स्थिरबुद्धी तटस्थपणाचे एक प्रतीकच नाही का? मराठीत क्रिकेटचे धावते समालोचन करणारा कुणी यार महान शब्दाचा वापर / विचार करील काय? सध्या वापरात असलेला पंच हा शब्द नुसताच चुकीचा नसून (चिं. वि. जोश्यांच्या ''साजणी' ची इथे कितीकांना आठवण येईल?) फार आळणीही आहे.

**गौरी देशपांडे**

# भाषांतर एका सुवचनाचे

गौरी देशपांडे

('भाषा आणि जीवन' च्या वर्ष १५ अंक १ मध्ये 'good times, Bad times, Books for all times' या सुवचनाच्या भाषांतराचे आवाहन केले होते. (पृ. ३४ पानपूरक). डॉ. भास्कर गिरधारी यांनी त्याला सुचवलेले भाषांतर १५:४/दिवाळी १९९७ या अंकात प्रसिद्ध झाले. (पृ. ४ पानपूरक). त्यावर गौरी देशपांडे यांनी ही प्रतिक्रिया पाठवली आहे. संपादक)

दिवाळी १९९७ च्या अंकात पृ. ४ च्या तळाशी एका इंग्रजी सुवचनाचे भाषांतर (३ पर्याय) दिले आहे, त्यात मूळ इंग्रजीचा थोडा विपर्यास होतो असे वाटते.

चटकदार भाषांतराच्या मागे लागताना भाषांतर सर्वच classes चे कर्म ''books'' असून प्रत्येक वेळी "for'' हे अन्वय त्याला जोडून आहे (अर्थात अध्याहृतपणे). जर ''बोलीभाषा''च्या सदरातून काढून हे वाक्य व्याकरणदृष्ट्या बरोबर लिहिले, तर ते असे दिसेल :

"(We have) (Books for) Good Times, (Books for) Bad Times, Books for All Tiems.' पण मराठीमध्ये ''मात्र'' घातल्याने या वाक्याचा अर्थ काहीसा ''काळ बदलतो पण पुस्तके शाश्वत असतात.'' असा होतो; तो मूळ सुवचनात अभिप्रेत नाही. (माझ्या समजुतीप्रमाणे हे सुवचन म्हणजे एका मोठ्या पुस्तक-विक्रेत्याची जाहिरात आहे.) फारसे चांगले नाही पण चालण्यासारखे भाषांतर ''अवेळ, सुवेळ, सारा वेळ / पुस्तकांशी जमेल मेळ'' असे करता येते.

□□□

**३०३ कार्लाइल कोर्ट**
**क्लोव्हर व्हिलेज वानवडी, पुणे**

# आदिवासी विद्यार्थ्यांमधील भाषिक न्यूनगंड : वास्तव आणि उपाय

**कैलास सार्वेकर**

भाषिक न्यूनगंड ही समस्या कमी-अधिक प्रमाणात प्रत्येक बोलीभाषक समाजात आढळून येते. मग तो प्रगत समाज असो नाहीतर मागास. अनेक गोष्टींमुळे कोणत्याही प्रगत समाजाला अप्रगत समाजापेक्षा अधिक प्रतिष्ठा प्राप्त झालेली असते. स्वाभाविकच प्रगत समाजाची भाषा अप्रगत समाजाच्या भाषेपेक्षा प्रतिष्ठित मानली जाते. कोणताही अप्रतिष्ठित भाषक जेव्हा त्याच्यापेक्षा प्रतिष्ठित भाषा शिकू-बोलू लागतो तेव्हा त्याच्या मनात न्यूनगंडाची भावना निर्माण होते. अगदी प्रमाण मराठी भाषक जेव्हा इंग्रजीसारखी जागतिक प्रतिष्ठेची भाषा बोलू लागतो, तेव्हा त्याच्या मनात अशी न्यूनगंडाची भावना कमी-अधिक प्रमाणात दिसून येते. त्यामुळे तो सहसा संभाषणासाठी या भाषेचा वापर कमी करतो. उलट प्रतिष्ठित भाषक कमी प्रतिष्ठेची भाषा बोलतो, त्यामुळे तो कौतुकाचा विषय बनतो. भटका/विमुक्त समाज इतर प्रतिष्ठित समाजापासून फार काळपर्यंत दूर/अलग आणि उपेक्षित राहिल्याने त्यांच्या बाबत ही गोष्ट अधिक प्रमाणात जाणवते इतकेच.

'आपले उच्चार, शब्द, वाक्यरचना यांत काही चुका होत नाहीत ना' अशी भीती हे या न्यूनगंडाचे प्रमुख कारण सांगता येईल. उच्चार-शब्द-वाक्यरचनेतल्या चुका जेव्हा स्वतः त्या त्या भाषकाला जाणवू लागतात तशी न्यूनगंडाची भावना अधिक होत जाते. मात्र या चुका लक्षात घेऊन सातत्याने त्या दुरुस्त करण्याचा प्रयत्न केला तर तो दुसरी भाषाही उत्तम प्रकारे बोलू लागतो. न्यूनगंडाचे भय कमी होऊन त्या जागी आत्मविश्वासही येऊ लागतो.

नवापूर या धुळे जिल्ह्यातील आदिवासी तालुक्याच्या ठिकाणी महाविद्यालयीन स्तरावर मराठी विषय शिकवीत असताना प्रस्तुत अभ्यासकास ही गोष्ट प्रकर्षाने जाणवली.

१) आदिवासी विद्यार्थी वर्गात बोलत नाहीत.

२) वर्गात किंवा वर्गाबाहेर शंका उपस्थित करणे, प्रश्न विचारणे तर दूरच पण शिक्षकांनी विचारलेल्या प्रश्नांना उत्तरे देण्याचेही ते टाळतात.

३) पाठातील विनोद, कारुण्य, वीर आदी भावोत्कट प्रसंग शिकविताना





अनुक्रमणिका

त्यांच्या चेहऱ्यावर अनुकूल प्रतिसाद फारसा दिसत नाही.

४) वाचताना जोडाक्षरांचे उच्चारण अडखळत/अस्पष्ट करतात.

५) वाद-विवाद-चर्चेत उत्स्फूर्त भाग घेत नाहीत.

या आणि अशा वस्तुस्थितीमुळे एरवी कष्टाळू, प्रामाणिक, सांगितलेले काम कुरबूर न करता करणाऱ्या आदिवासी विद्यार्थ्यांमध्ये पराकोटीचा भाषिक न्यूनगंड असल्याचे लक्षात आले. आदिवासी विद्यार्थ्यांमधला हा न्यूनगंड कमी करण्यासंदर्भात काही प्रयोग केले. त्यातून आशादायक असे चांगले परिणाम जाणवले. या प्रयोगांबद्दल सांगण्यापूर्वी येथील परिसर, बोली भाषेचे स्वरूप, आदिवासी बोलीची काही उच्चार वैशिष्ट्ये याबद्दल थोडक्यात माहिती सांगणे अधिक उचित होईल असे वाटते.

धुळे जिल्ह्यातल्या नवापूर, नंदुरबार, अक्कलकुवा, तळोदा, धडगाव, शहादा, शिरपूर व साक्री या तालुक्यांतील डोंगराळ भागात आदिवासी समाज मोठ्या संख्येने राहतो. वळवी, कोकणी, मावची, वसावे, गावीत, पाडवी, पावरा, नाईक, गायकवाड, पराडके, पवार अशा वेगवेगळ्या आडनावांचा आदिवासी समाज प्रामुख्याने मावची/ वसावे, कोकणी आणि पावरा या आदिवासी बोली बोलतो. या तीन बोलींत भिन्नता आढळते तशी काही समान वैशिष्ट्येही आढळतात.

गुजरातच्या सीमेला लागून असलेले नवापूर शहर आणि नवापूर तालुका. या परिसराचा संबंध गुजरात राज्यातील व नवापूर शहरातील गुजराती समाज-भाषेशी अधिक प्रमाणात येत असल्याने आदिवासी बोलींवर गुजरातीचा प्रभाव अधिक जाणवतो. त्या खालोखाल राजस्थानी/मारवाडी आणि हिंदीचाही प्रभाव थोड्याफार प्रमाणात दिसतो.

प्रमाण मराठीपासून दीर्घकाळ अलग राहिल्याने तसेच शिक्षण, दळणवळण, व्यावसायिक, आर्थिक प्रगतीचा अभाव अशा अनेक कारणांनी या परिसरातील आदिवासी बोलीचे स्वरूप प्रमाण मराठीपेक्षा अनेक बाबतींत भिन्न राहिले.

या बोलीची काही वैशिष्ट्ये आहेत. ती लक्षात घेतली असता या बोलीचे मराठीपेक्षा असलेले वेगळे स्वरूप समजून घेता येते. निरीक्षणातून मिळालेली या बोलीच्या उच्चार प्रक्रियेची काही प्रमुख वैशिष्ट्ये अशी-

१) आदिवासी बोलीत शब्दाच्या आद्य अक्षरातील व्यंजनासोबत येणाऱ्या 'अ' या स्वराच्या जागी 'ओ' या स्वराचे उच्चारण होण्याची प्रक्रिया सर्रास दिसून येते. उदा. खत > खोत, करवत > कोरवत, बदक > बोदको रंग > रोंग > रक्त > रोगत, मदत > मोदत, गड > गोड, सण > सोण, सरपंच > सोरपंच, नवीन

> नोवा, सभा > सोभा

ही प्रक्रिया सतत घडत असल्याने तशी उच्चारण सवय झालेली दिसून येते. आदिवासींप्रमाणेच मराठी भाषा बोलतानाही मराठी शब्दांचे उच्चारण याप्रमाणे होण्याची प्रक्रिया दिसते. त्यामुळे हे भिन्नत्व लगेच जाणवू लागते.

२) 'अ' 'ओ' या उच्चारणप्रक्रियेखालोखाल जाणवणारी गोष्ट म्हणजे शब्दांचे सानुनासिक तसेच अस्पष्टोच्चारित अर्धचंद्रबिंदू उच्चारण.

उदा. उमर > उंबोर, आम्ही > आमाँ, सावली > साँव, मी > आँय, माणूस > माहूँ, भाऊ > पाहूँ, माझे > मायूँ या प्रमाणे 'बरं का?' ऐवजी 'हाँ का' किंबहुना 'हाँ का'. ही बहुसंख्य आदिवासी बोलीभाषकांची लकबच झालेली दिसते. याचे प्रत्यंतर मराठी बोलतानाही येते.

३) मराठीतील ऐ, औ या संयुक्त स्वरांची आणि अः विसर्गाची उच्चारणे आदिवासी बोलीतील उच्चारणात जाणवत नाहीत.

'ऐ' आणि 'औ' च्या जागी अनुक्रमे 'ओई' आणि 'ओव' ही उच्चारणे मिळतात.
जसे 'ऐ' > 'ओई' = बैल > बोईल, पैसा > पोयसा
'औ' > ओव = कौल > कोवल, चौदा > चोवदा

४) घ, छ, य, श, ष (स), ह, ळ, क्ष, ज्ञ इ. व्यंजनांची उच्चारणे आढळत नाहीत. त्यांच्यात खालीलप्रमाणे उच्चारण बदल प्रक्रिया आढळते.

घ > ग = वाघ > वाग
छ, श, ष > स = छ - छाती > साती, छत्री > सातरी, छत्तीस > सत्तीस
श - शनिवार > सोनिवार, शेण > सा, शाळा > साला
ष - भाषा > भासा,पोषाख > पोसाक, षटकोन > सटकोन
स > ह़ = ससा > हहा, साग > हाग, शिकणे > हिकणे, शोधणे > होदणे,
सवय > होवाय, साबू > हाबू, सूत > हूत, सांगाती > हेंगाती
सुतार > हुतार, सुकवून होकवून, समजलो > होमजुलो

'छ' 'ष' 'स' चा 'स' होणे आणि 'स'च्या जागी 'ह' होणे ही प्रक्रिया गुजरातीत मोठ्या प्रमाणावर दिसून येते. गुजरातीच्या या उच्चारप्रक्रियेचा प्रभाव आदिवासी बोलीवर झाला असावा.

क्ष > कस = अक्षर > आकसोर, शिक्षण > सिकसोण, नक्षी > नोकसी
ज्ञ > न = ज्ञानदेव > न्यानदेव
ळ>ल = दिवाळी>दिवाली, होळी>होली, शाळा>साला

मिळवू > मिलवू, फळा > फोला, फळ > फोलवो, अळ्या > ओले, गूळ > गुल, आंधळा > आंदलो, मिळते > मिलेहे, डाळ्या > दाल्या, दळण > दोलन, आवळा > आवला, बगळा > बगलो, कोळसा > कोलाहा, पाळीव > पालुला/ली/ले, पिवळा > पिवलो

याशिवाय इतरही काही उच्चार परिवर्तने आढळतात ती अशी-

प > फ = परत > फाचा, पीस > फिच, पिसारा > फिचारो ण > य = पाणी > पाँय / पाँयी

न > ण आणि ण > न ही परिवर्तने विकल्पाने येण्याची प्रक्रिया इतर बोलींप्रमाणे आदिवासीतही जाणवते.

उदा. प्रवचन प्रवचण, आण आन

५) आदिवासी बोलीत जोडाक्षरयुक्त उच्चारणे आढळत नाहीत. अशावेळी जोडाक्षरांची उच्चारणे सुलभ करण्याचा कल दिसून येतो.

जसे - शुक्रवार > सुकरवार, प्रार्थना > परारथना, प्रश्न > परसनो, उत्तर > उतोर, कोल्हा > कोलो, नवरात्र > नोवरात, पेन्सील > पेनसूल

(जोडाक्षरांप्रमाणेच 'क्ष' आणि 'ज्ञ' या संयुक्त व्यंजनोच्चारांच्या वेळीही अशी सुलभीकरण प्रक्रिया घडते याची उदाहरणे आपण वर पाहिलीच.)

६) काही जोडाक्षरयुक्त शब्दांसाठी स्वतंत्र शब्द अस्तित्वात आहेत.

उदा. सर्व > बादे (गुज.बद्दा) तान्हे > होनो, शुद्ध > हारो (गुज.हारो) प्रयत्न > कोसीस (हिंदी-कोशीश) आहे (क्रियापद)> हा (हिंदी-है) येत (क्रियापद) आवे (राजस्थानी आवे) लग्न > वोराड (वऱ्हाड या अर्थीही) सूर्य > दिही (दिवस या अर्थीही) पृथ्वी > तोरती (हिंदी-धरती) धनुष्य > तीरकामठा

७) मराठी महिन्यांची बहुसंख्य नावे जोडाक्षरयुक्त आहेत. या नावाचे सुलभीकरण किंवा स्वतंत्र शब्द या ऐवजी वेगळीच गोष्ट जाणवते. आदिवासी समाजात सणांना अनन्यसाधारण महत्त्व आहे. त्या त्या महिन्यात येणाऱ्या सणांवरून (किंवा अन्य वैशिष्ट्यांवरून) ही नावे घेतली जातात.

उदा. चैत्र > गुडी पाडवो मोयनो, वैशाख > आंबारीण मोयनो
श्रावण > आमासी मोयनो, भाद्रपद > भादवो मोयनो
कार्तिक > दिवाली मोयनो, मार्गशीर्ष > गावदिवाली मोयनो
माघ > गिंब मोयनो, फाल्गुन > ओली मोयनो

८) प्रमाण मराठीत जसे आदरार्थी बहुवचन आहे तसे मराठीतल्या अनेक बोलींत





अनुक्रमणिका

नाही. प्रामुख्याने भटक्या जमातीच्या बोलींमध्ये ते आढळत नाही. आदिवासी बोलीतही आदरार्थी बहुवचन नसल्याने 'आरे डाक्तऱ्या' 'आरे मास्तऱ्या' अशी संबोधने, 'तुम्हाला' ऐवजी 'तुला' अशी रूपे बोलली जातात.

या वस्तुस्थितीदर्शक बोली वैशिष्ट्यांमुळे आदिवासी विद्यार्थ्यांमध्ये भाषिक न्यूनगंड निर्माण होत असावा, हे लक्षात आले. अर्थात प्राध्यापकी थाटात ही वैशिष्ट्ये त्यांना समजावून सांगून बदल घडविणे प्रारंभी तरी अशक्य वाटले. प्रथम वर्षाच्या विद्यार्थ्यांना अशा पद्धतीने सांगण्याचा प्रयत्न केला तर ही गोष्ट त्यांना अधिक तांत्रिक, क्लिष्ट आणि नीरस वाटण्याची शक्यता होती. अशा पद्धतीने गेल्यास अनुकूल परिणाम जाणवण्याऐवजी प्रतिकूल प्रतिसाद मिळण्याचीच शक्यता अधिक होती.

म्हणून श्रवण, लेखन, वाचन-संभाषण या भाषिक कौशल्ये वृद्धिंगत करण्याच्या मार्गांनी जाणे अधिक सोयीचे वाटले. या मार्गांनी जाताना पुढील गोष्टी मनाशी निश्चित केल्या.

१) विद्यार्थी-शिक्षक या नात्यापेक्षा त्यांच्यात मिसळून त्यांच्याशी मित्रत्वाचे-आपुलकीचे नाते प्रस्थापित केले पाहिजे. शिक्षकाबद्दलची आदरयुक्त भीती कमी करून 'हा कोणी वेगळा माणूस आपल्याला शिकवतोय' असे वाटण्याऐवजी 'हा आपल्यातलाच माणूस असून आपल्याशी नाते जोडण्याचा प्रयत्न करतोय' अशी भावना त्यांच्यात निर्माण व्हायला हवी.

२) वर्गात शिकवीत असताना आलंकारिक, प्रौढ भाषेत बोलण्याऐवजी सहज, साध्या भाषेत बोलायचे. शक्य तेथे त्यांच्या जीवनातील, समाजातील उदाहरणे देत त्यांचा प्रतिसाद मिळवीत जायचे.

३) याप्रमाणे शिकवीत असताना, ''तुमचे लक्ष शिकविण्याकडे वेधण्यासाठी मी तुम्हाला शिकवलेल्या भागाबद्दल प्रश्न विचारीन. त्याने तुम्ही नाराज होऊ नका. उत्तर चुकले तरी चालेल पण बोलण्याचा प्रयत्न करा. वर्गातील मुले मुली आपलेच भाऊ बहीण आहेत. मीही तुमच्यातलाच एक आहे. वर्गात आपल्याशिवाय दुसरं कोणी नाही. एखाद्याचं उत्तर चुकलं तरी त्याला हसू नका. चुका दुरुस्त करता करताच शिकायचं असतं.'' अशा सूचना वेळोवेळी देऊ लागलो.

४) उत्तरे देताना विद्यार्थी चुकला तरी लगेच त्याला दोष न देता दुरुस्त उत्तरे / उच्चारादी गोष्टी समजावून सांगायच्या 'अशा प्रकारे उत्तरे दिली तर अधिक

चांगले' असे सांगून योग्य उत्तर / उच्चार त्याच्याकडून वदवून घ्यायचे. योग्य उत्तर देणाऱ्याला शाबासकी देऊन प्रोत्साहित करायचे. जेणेकरून तो पुन्हा चांगल प्रतिसाद देईल. शिवाय इतर विद्यार्थ्यांनाही त्याचे अनुकरण करावेसे वाटेल.
५) थोडक्यात वर्गात आपुलकीचे, खेळीमेळीचे, हसतखेळत असे वातावरण निर्माण करून शिक्षणात त्यांचा सहभाग वाढवायचा.
६) प्रथम वर्ष, द्वितीय वर्ष आणि तृतीय वर्ष अशा टप्प्याटप्प्याने त्यांच्यातील बुजरेपणा कमी करण्याचा प्रयत्न करायचा.

या साऱ्या गोष्टींसाठी 'व्यावहारिक / उपयोजित मराठी' च्या अभ्यासक्रमाच आणि उत्तर महाराष्ट्र विद्यापीठाने द्वितीय व तृतीय वर्ष कला या वर्गांना विशे स्तरावर सुरू केलेल्या प्रात्यक्षिक उपक्रमाचा उपयोग प्रस्तुत अभ्यासकास मोठ्य प्रमाणावर झाला.

प्रथम वर्षाच्या विद्यार्थ्यांना सुरुवातीच्या एक महिन्यात शुद्धलेखन विषयक नियम शिकविण्याचा परिपाठ चालू ठेवला. लिहून झालेला एकेक नियम त्यांच्याकडून पुन्हा वाचून घेऊन समजावून सांगणे. नंतर त्यांच्याकडून तोंडी वदवून घेणे अस क्रम ठेवला.

संपूर्ण नियम शिकवून झाल्यावर जरा वेगळ्या पद्धतीने त्यांच्यात स्पर्धेचे आयोजन केले. विद्यार्थ्यांना अगोदर कल्पना दिली की, ''शुद्ध लेखनांच्या नियमांची आपण स्पर्धा घेऊ. स्पर्धेत भाग घेणारे तुम्ही, तपासणार तुम्ही आणि बक्षीस देणारेही तुम्हीच! तोंडी सांगून लिहून झालेले नियम कसे तपासायचे? तर प्रत्येक नियमाला एक आणि त्यासाठी दिलेल्या उदाहरणाला एक गुण द्यायचा. मुलांचे पेपर्स मुली तपासतील तर मुलींचे पेपर्स मुले तपासतील. स्पर्धेच्या दिवशी प्रत्येकाने सोबत फक्त एक रुपया आणायचा. वर्गात जेवढे विद्यार्थी जमतील तेवढ्या रुपयांचे बक्षीस सर्वाधिक गुण मिळविणाऱ्या विद्यार्थ्यास आपण देऊ.''

याप्रमाणे घेतलेल्या स्पर्धांना चांगला प्रतिसाद मिळत गेला. जास्तीत जास्त विद्यार्थी उत्स्फूर्तपणे भाग घेऊ लागले. परिणामी शुद्ध लेखनाचे नियम तर ते आत्मसात करू लागलेच पण त्याचबरोबर त्यांच्यातला आत्मविश्वासही वाढीला लागत असल्याचे निदर्शनास आले.

निबंध-पत्रलेखनातही लेखन-वाचन-भाषण ही पद्धती अनुसरली. 'माझी आई', 'माझा गाव', 'मी प्राचार्य झालो तर!', 'आमचे महाविद्यालय' असे निबंधाचे



अनुक्रमणिका

विषय दिले. तसेच, सुटीच्या काळात तुम्ही गावाकडे न जाता टंकलेखन, संगणक, शिवणकाम यांसारख्या एखादा व्यवसायाभिमुख छोटा कोर्स पूर्ण करणार आहात.अशी कल्पना करून तुमच्या वडिलांना पत्र लिहा. यासारखे विषय पत्र लेखनासाठी दिले. पत्र-निबंध घरून लिहून आणावयास सांगितले. लिहिलेल्या निबंधाचे त्या त्या विद्यार्थ्याला वर्गात वाचन करावयास सांगितले. वाचन झाल्यावर त्या निबंधासाठी नवीन मुद्दे / माहिती, अयोग्य शब्द / वाक्यरचना / उच्चार यांच्या दुरुस्त्या इ. सांगितले. वाचनाच्या उपक्रमानंतर एका दिवशी पूर्वसूचना देऊन लिहिलेला निबंध वर्गात तोंडी सांगण्यास सांगितले. पूर्वतयारीसाठी पुरेसा वेळ दिल्याने आणि विद्यार्थ्यांची मानसिक तयारी करून घेतल्याने यालाही चांगला प्रतिसाद मिळू लागला.

प्रथम-द्वितीय वर्षाच्या वर्गात वृत्तपत्र-आकाशवाणीसाठी मुलाखत लेखन हा घटक शिकवीत असताना दोन विद्यार्थ्यांना वर्गात मुलांसमोर उभे करून त्यांच्याकडून पुस्तक-वृत्तपत्रातल्या छापील मुलाखती नाटकातील पात्रांप्रमाणे वाचून घेतल्या. वाचनातील चढउतार, नाट्यात्मता, प्रश्नोत्तरातील / वाक्यातील लकबी इ. गोष्टी कृतीसह समजावत गेल्याने मुलाखत रंजक तर वाटू लागलीच, शिवाय अप्रत्यक्ष का होईना पण वाचनातला जिवंतपणा विद्यार्थी आत्मसात करू लागले.

द्वितीय आणि तृतीय वर्षाच्या विशेष पेपर क्र. २ व वि.पे.क्र. ४ ला असलेल्या प्रात्यक्षिकांचाही उपयोग या कामी झाला. द्वितीय वर्षाला नेमलेल्या पुस्तकांच्या लेखकाची सर्व पुस्तके वाचणे, त्यांचा परिचय, पाठ्य पुस्तकातील पात्रांचे एकमेकांशी असलेले संबंध, वाङ्मयप्रकारांची सूची, इ. विषयांवर विद्यार्थ्यांकडून प्रात्याक्षिके करून घेतली. उदा. 'गोतावळा' हे पुस्तक द्वितीय वर्षाला आहे. त्यासाठी 'गोतावळा' तील पात्रसृष्टीचा परिचय, त्यांचे एकमेकांशी असलेले संबंध, आनंद यादवांच्या साहित्याची सूची आणि साहित्यकृतींचा परिचय. मराठी ग्रामीण कादंबऱ्यांची सूची आणि ठळक कादंबऱ्यांचा परिचय या प्रमाणे केलेल्या प्रात्यक्षिकांनी वाङ्मयाची आवड वाढीस लागण्यास मदत झाली.

तृतीय वर्षासाठी असलेल्या 'वर्णनात्मक भाषा विज्ञान आणि व्याकरण' या विषयाच्या प्रात्यक्षिकांनी तर यापुढचा टप्पा गाठता आला. आदिवासी बोलीतील वाक्प्रचार, लोककथा, लोकगीते यांचे संकलन करण्यास- मराठी अर्थासह त्याचीमांडणी करण्यास सांगितले. लोकसाहित्याबरोबरच आदिवासी बोलीतील नामे, सर्वनामे,

विशेषणे, उच्चारवैशिष्ट्ये, मावची-कोकणी-पावरा या बोलींबरोबरच या परिसरात बोलल्या जाणाऱ्या अहिराणी-गुजर-उर्दू आदी बोलींचा शब्दसंग्रह, एकेका शब्दासाठी या बोलीत असलेले विविध शब्द यांचा संग्रह इ. विषयांवर प्रात्यक्षिके यांचा भाषिक अभ्यासाची रुची वाढण्यास मोठा हातभार लागला.

याशिवाय नवापूर महाविद्यालयातर्फे 'एकलव्य' हे वार्षिक नियतकालिक आणि 'आदिरंग' ही हस्तलिखित भित्तिपत्रिका १९८९-९० पासून सुरू झाली. या दोन्हींच्या संपादनाची कामे सुरुवातीची पाच वर्षे केली. त्यातून विद्यार्थ्यांनी संकलित केलेल्या आदिवासी लोकसाहित्याला मराठी रूपांतरासह प्रसिद्धी देता आली. लोकसाहित्याबरोबरच आदिवासी समाजाचे सण, उत्सव, चालीरीती, अंधश्रद्धा, लोकजीवन अशा अनेक विषयांवर विद्यार्थ्यांकडून जाणीवपूर्वक लेखन करून घेता आले. ते प्रसिद्ध झाल्याने त्यांचा लेखन उत्साह वाढत गेला. काही प्रतिभासंपन्न मुले तर आपल्या मायबोलीतून कविता-कथा आदी साहित्यलेखन करू लागले. या साहित्याला 'एकलव्य-आदिरंग' बरोबरच वृत्तपत्रीय साहित्य-पुरवण्या, मासिके, आकाशवाणी या माध्यमांतून प्रसिद्धी मिळू लागली.

गेल्या काही वर्षांच्या काळात प्रस्तुत अभ्यासकाने या दिशेने केलेले हे अल्पसे प्रयत्न. या प्रयत्नांनी फार मोठे बदल झाले असा दावा नाही. तथापि या दिशेने केलेले प्रयोग बऱ्याच अंशी फलदायी ठरले. या आणि अशा प्रयोगांनी भाषेच्या क्षेत्रातील बुजरेपणा कमी करता येऊ शकतो, असे मात्र निश्चितपणे म्हणता येईल.

**आधार साधने :**


१) आदिभारती :भिली, पुस्तक पहिले. १९९५ महाराष्ट्र राज्य शैक्षणिक व प्रशिक्षण परिषद, पुणे - ३०.

२) शिक्षकांसाठी हस्तपुस्तिका - आदिभारती : भिली : पुस्तक पहिले : प्रका. वरीलप्रमाणे.

३) नवापूर महाविद्यालयांच्या 'एकलव्य' आणि 'आदिरंग' चे १९८९-९० ते १९९३-९४ या पाच वर्षांतील अंक.


□□□


**५६ ब, मंगलदास पार्क,**

**नवापूर, जि. धुळे (४२५४१८)**

# बोली आणि वाहतुकीचं साधन

**जयंत देव**

भाषा बारा कोसांवर बदलते किंवा एखादी गोष्ट 'पंचक्रोशीत' झाली अशा प्रकारचे वाक्प्रचार रूढ आहेत. 'पंचक्रोशी' म्हणजे आजच्या भाषेत १६ किलोमीटरच्या त्रिज्येत येणारा परिसर, जुन्या वाक्प्रचारांमधले हे 'बारा' किंवा 'पाच' हे अंतराचे आकडे तेच का आले, त्या जागी पंधरा-वीस असे दुसरे कुठले का आले नाहीत? तर याचे कारण, वाहनाचा वेग आणि भाषेचे, माहितीचे प्रसरणक्षेत्र यांचा एकमेकांशी खूप संबंध असतो, हे असावे.

बैलगाडी, घोडागाडी, ही जुन्या काळातील वाहने. ताशी दोन कोसांचा त्यांचा वेग. दुसऱ्या गावी किंवा वसतीवर जाऊन तिथे कामासाठी तीन ते चार तास हाताशी ठेवून त्याच दिवशी घरी परतण्यासाठी पुन्हा परतीचा प्रवास करायचा, यासाठी अडीच ते तीन तासांच्या अंतराच्या परिघातील गावांना जाऊन येणेच शक्य होते. या हिशेबाचे हे अंतर ५-६ कोस एवढेच येते.

पाच कोसांच्या त्रिज्येच्या वर्तुळात असणाऱ्या वाड्या-वस्त्या यांचा संबंध त्यांच्या मध्यभागी असणाऱ्या महत्त्वाच्या, मोठ्या गावाशीच येत असणार. त्यातूनच पंचक्रोशीत निर्माण होणारी, परस्परांवर अवलंबून असणारी सामाजिक संस्कृती तयार होत असणार. हा परस्पर संपर्क जितका दाट तितकी त्या सर्वांची भाषा एकजिनसी. गावं, खेडी सर्वदूर पसरत गेलेली असली तरी त्यांतल्या एका गावाचा संबंध पाच सहा कोसांपलीकडच्या दुसऱ्या गावाशी वरचेवर येणं, त्या काळातल्या वाहतुकीच्या साधनाचा वेग पाहता, तसं दुरापास्तच आणि माणसा-माणसांमधला संबंध विरळ होत गेला की त्यांच्या भाषेतही फरक पडत जाणार.

एखाद्या मध्यवर्ती गावाभोवती ५ कोसांच्या त्रिज्येत पसरलेली वस्ती तेवढ्या पंचक्रोशीत आपापले व्यवहार पार पाडत असते. या पंचक्रोशीभोवती विखुरलेला एखादा दुसाऱ्या कोसाचा प्रदेश, आणि मग दुसऱ्या वस्तीची सुरुवात. त्या वस्तीच्या केंद्रस्थानी असलेलं आणखी एखादं ठाणं आणि तिनं निर्माण केलेली दुसरी पंचक्रोशी. दोन महत्त्वाच्या गावांमधला एखाद दुसऱ्या कोसाचा सीमावर्ती प्रदेश धरून एका गावापासून दुसरे मोठे ठाणे कमीतकमी बारा कोसांवर असायला हवे. (जवळच्या दोन तालुक्यांतील अंतर साधारण बारा कोस म्हणजेच, साधारणपणे ३०-३५ किलोमीटर, असते.)

या दोन मोठ्या गावांमधला संपर्क त्यामानाने कमी असल्याने बोलीभाषा बारा कोसांवर बदलत असल्यास आश्चर्य वाटायला नको. आधुनिक काळातील वेगवान वाहने, दूरध्वनी, इ-मेल, महासंगणक जालक, चित्रवाणी इत्यादींमुळे 'बारा कोस' हे म्हणीतच राहणार.

मुळात 'कोस' किंवा 'क्रोश' हे शब्द अंतराचे मापन करणारे म्हणून कसे प्रचारात आले हे पाहणेही गमतीचे आहे. 'क्रोश' या संस्कृत शब्दाचा अर्थ आहे मोठ्याने ओरडणे, हाकारणे, आरोळी असा. मोठ्याने ओरडून बोललेले जिथपर्यंत ऐकू जाते तेवढे अंतर म्हणजे एक 'कोस'*. माणसा-माणसांतलं अंतर शेवटी बोलण्यातूनच मोजलं जात होतं, जोडलं जात होतं.

*(* 'कोस ची ही व्युत्पत्ती डॉ. अशोक रा. केळकर यांनी लक्षात आणून दिली त्याबद्दल त्यांचे आभार.)*

□□□

**सुप्रिया, ६१/१४ एरंडवन**
**पुणे - ४११ ००४**

---

## गोष्ट फिल्टर होऊन येते

अक्षयचं वय पाच वर्षाचं. त्याला वयाच्या तिसऱ्या वर्षापासूनच लहान मुलांच्या गोष्टींच्या कॅसेटस् ऐकायची सवय. त्या गोष्टी त्यानं जशाच्या तशा पाठ केल्या. लहर लागली.... गोष्टी सांगू लागला. मग त्याच्या कथाकथनाचे कार्यक्रम वरचेवर होऊ लागले. पाहुणे मंडळी आली, की त्याला गोष्ट सांगण्याचा आग्रह होऊ लागला. शेवटी शेवटी तो, गोष्टी सांगायला इतका कंटाळू लागला, की त्याला त्याचा वीट आला. त्याला आग्रह करणं बंद झालं. तो आपणहून केव्हा गोष्ट सांगेल ते सांगू देत, असं म्हणून त्याला कुणीच आग्रह केला नाही.

त्याचं गोष्टी ऐकण्याचं वेड मात्र अजूनही तसंच आहे. परवा तो लक्ष देऊन गोष्ट ऐकत होता. त्याला त्याच्या बाबांनी विचारलं,

''अक्षय, गोष्ट कधी सांगणार?''

''फिल्टरमधून पाणी येतंय की नाही तशी सांगतो.'' जरा विचार करीत अक्षय म्हणाला.

''म्हणजे काय?'' बाबांनी पुन्हा विचारलं.

अक्षय म्हणाला, ''फिल्टरमध्ये पाणी घातल्यावर थोड्या वेळानं तोटीतून पाणी येतंय की नाही, तशी मी थोड्या वेळानं गोष्ट सांगतो.''

**मानसी आ. यार्दी**
**मराठा गल्ली, धारवाड ५८०००१**

# विद्यार्थ्यांचा सखा : शालेय शब्दकोश

(परीक्षित ग्रंथ - राज्य मराठी विकास संस्था निर्मित 'शालेय मराठी शब्दकोश', संपादक वसंत आबाजी डहाके, गिरीश पतके, प्रकाशक - शुभदा - सारस्वत प्रकाशन, पुणे ५, प्रथमावृत्ती : ऑगस्ट १९९७, मूल्य ६० रुपये, पृष्ठ संख्या २२४)

**परीक्षण लेखक - डॉ. विजया देव**

शब्दकोशांचे महत्त्व सर्वच कार्यक्षेत्रांमध्ये किती असते हे सांगायची गरज नाही पण शब्दकोशाचे महत्त्व पटणे, तो वापरता येणे · या गोष्टींची पायाभरणी शालेय जीवनात व्हावी लागते. शालेय विद्यार्थ्यांना मराठीतून शिक्षण घेताना आपली भाषा आणि क्रमिक पाठ्यपुस्तकांतील विषय यांची चांगली समज यावी म्हणून सुटसुटीत अशा मराठी कोशाची गरज होती. ती गरज भागवण्याचा एक चांगला प्रयत्न राज्य मराठी विकास संस्थेने केला आहे.

पाठ्यपुस्तकांमध्ये प्राचीन गद्य-पद्यातील वेच्यांपासून आजच्या आधुनिक दलित, ग्रामीण साहित्यापर्यंत भाषेची कालिक तसेच प्रादेशिक बदलती रूपे असतात. त्याचप्रमाणे भौतिक आणि सामाजिक शास्त्रांमधील संकल्पना, पारिभाषिक संज्ञा असतात. या सर्वांना सामावून घ्यायचे, विद्यार्थ्यांना कोश सहज हाताळता येईल असा त्याचा आकार सुटसुटीत ठेवायचा, किंमत पालकांना परवडेल अशी माफक ठेवायची, नकाशे, शुद्धलेखनाचे नियम इत्यादी सामग्री देऊन त्याचे संदर्भमूल्य वाढवायचे अशी अनेक आव्हाने पेलत हा कोश तयार झाला आहे. या 'शालेय मराठी शब्दकोशा'तील शब्दांची निवड प्राथमिक, माध्यमिक, उच्च माध्यमिक स्तरावरील सर्व विषयांची पाठ्यपुस्तके, नियतकालिके आणि वृत्तपत्रे या सामग्रीच्या आधारावर केलेली आहे.

पर्यायी प्रतिशब्द, स्पष्टीकरणात्मक व्याख्या, शब्दाचा वाक्यातील उपयोग,

शब्दाचा अर्थ यातून समजतो त्याचप्रमाणे त्याच्या जोडीला, तो शब्द ज्या वस्तूचा वाचक आहे त्या वस्तूचे रेखाचित्र असेल तर चटकन कळतो. अशा कित्येक रेखाचित्रांनी, रेखाटनांनी हा कोश अधिक उपयुक्त बनला आहे. शिरस्त्राण, आलेख, वल्हे, रांजण, फाळ, साकव, लंगर ही वानगीदाखल काही उदाहरणे. शिरस्त्राणांच्या रेखाटनात पगडी, टोपी या पारंपरिक चित्रांबरोबरच हेल्मेटचाही समावेश आहे. त्यामुळे या कोशाला एक प्रकारची अद्ययावतता आली आहे. (संदर्भाचा असा ताजेपणा आणखी एका ठिकाणी दिसतो. शब्दाचा अर्थ संदर्भासहित कळावा म्हणून कित्येक शब्दांचे वाक्यात/वाक्यांशात उपयोग करून दाखवले आहेत. त्यात 'अंधविश्वास'चा वाक्यात उपयोग पहा : 'गणपतीची मूर्ती सोंडेने दूध प्यायली अशी अफवा पसरली आणि लोकांनी ती अंधविश्वासाने खरी मानली.' या घटनेने नुकतीच खळबळ माजवली होती. तिचा चपखल वापर उदाहरणात केला आहे. आणखी काही काळानंतर या घटनेची आठवण राहिली नाही तरी आज हे वाचून गंमत वाटते.) सारांश, या कोशातील अशी वाक्ये/वाक्यांश म्हणजे शब्दांचा नुसता व्याकरणिक उपयोग सांगणाऱ्या निर्जीव रचना नाहीत.

रेखाचित्रांच्या जोडीलाच या कोशात भारत, महाराष्ट्र, मुंबई यांचे एकूण पंधरा नकाशे आहेत. पशुपक्षी, वस्तू, पिके यांची रेखाचित्रे, तसेच भारतीय लिप्या, मूलद्रव्यसंज्ञा इत्यादींची स्वतंत्र परिशिष्टे आहेत.

विद्यार्थी, शिक्षक, पालक यांच्या गरजा लक्षात घेऊन शालेय अध्ययन सामग्रीत राहून गेलेली एक उणीव राज्य मराठी विकास संस्थेने भरून काढली यात शंकाच नाही. पण हा कोश निर्दोष आणि परिपूर्ण आहे असा याचा अर्थ नव्हे. कोशरचनाकारांचाही तसा दावा नाही. यातील काही त्रुटींचा इथे निर्देश करत आहे. या उणिवा मुळाक्षरे, शब्दांचे अर्थ, प्रतिशब्द, रेखाचित्रे, वाक्प्रचार आणि कोश समाविष्ट शब्द यांच्या संदर्भातील आहेत.

१) कोश हाताळण्यासंबंधी मुख्य कोशापूर्वी जी माहिती असते त्या पृष्ठांमध्ये 'कोशात शब्द कसा शोधावा?' या मथळ्याखाली (पृ. १ ते २१) या कोशातील वर्णक्रम दिलेला आहे. या मुळाक्षरांच्या तक्त्यात 'ष' चा समावेश नाही. ही मुद्रणत्रुटी अनवधानाने राहून गेलेली असावी.

२) कर्ण, आंतरकोन, काटकोन इत्यादी भौमितिक आकृतींना रोमन लिपीतील मुळाक्षरे

(A, B, C, M, N, O ...) दिली आहेत. हे सहज टाळता आले असते.

३) या कोशातील स्पष्टीकरणात्मक रेखाचित्रे/रेखाटने दरवेळी त्या त्या शब्दापाठोपाठच येतात असे नाही. किंबहुना बऱ्याचदा ही रेखाटने त्याच पृष्ठावर इतरत्र किंवा दुसऱ्या पृष्ठावर येतात. अशा प्रकारे शब्दापासून रेखाटन दुरावलेले असल्यामुळे त्या रेखाटनाच्या तळाशी पुन्हा तो शब्द यायला हवा. असे होत नाही. उदाहरणार्थ 'डूल' या आभूषणाचे रेखाटन 'डूल' या शब्दालगत न येता पुढे 'डेरेदाखल' या शब्दाखाली येते. तेव्हा त्या रेखाटनाखाली 'डूल' हा शब्द यायला हवा. आणखी एक. रेखाटनातील नेमका कोणता भाग त्या शब्दाचा वाचक आहे हेही स्पष्ट व्हायला हवे. उदाहरणार्थ, 'डुला'चे रेखाटन कानात घातलेला डूल असे आहे. या चित्रात कानाचे रेखाटन तुटक रेषांनी व डुलाचे सलग रेषांनी होणे आवश्यक ठरते. 'एरिअल' या उपकरणाच्या रेखाटनालाही हेच लागू आहे. मात्र सर्वत्र हा दोष आढळतो असे नाही. चुंबळ, मुसळ या रेखाटनांमध्ये या वस्तूंची रेखाटने सलग रेषांनी व चित्राचा उर्वरित पूरक भाग तुटक रेषांनी दाखवला आहे.

काही चित्रे यथार्थ वाटत नाहीत. उदाहरणार्थ, डोलीचे रेखाटन मेण्याच्या जवळपास जाणारे वाटते. चेतातंतू, चेतारज्जू यांची रेखाटने तपशीलवार असली तरी काहीशी संदिग्ध आहेत.

४) काही शब्दांच्या व्याख्यांमध्ये नेमकेपणा नाही. उदा. 'ढगळ' म्हणजे नुसते 'मोठे, मोठ्या आकाराचे' नव्हे. 'मापापेक्षा मोठे, सैल' ते ढगळ. 'छागल' या शब्दाचा अर्थ 'कातड्याचा पाणी भरण्याचा पोहरा' असा दिलेला असून रेखाचित्रात विहिरीतून वर येणारा पोहरा दाखवला आहे. छागल पोहरा म्हणूनच वापरतात असे नव्हे तर 'प्रवासात बरोबर वागवण्याची पाण्याची (कातडी) पिशवी' म्हणूनही वापरतात.

काही शब्दांचे त्यांच्या जोडीच्या दुसऱ्या काही शब्दांशी नित्य साहचर्य असते. त्या साहचर्य संबंधातून त्या शब्दांचा अर्थ आणि वापर समजायला मदत होते. उदाहरणार्थ, ढाल तलवार, पाढे परवचा इ. त्यामुळे 'ढाल', 'परवचा' या शब्दांच्या अर्थ स्पष्टीकरणात, त्यांच्या जोडीचे तलवार, पाढे हे शब्द येणे उचित होते.

५) वाक्प्रचारांच्या बाबतीत काही त्रुटी राहून गेल्या आहेत. 'इंगा' या नोंदीखाली

'इंगा फिरणे' हा वाक्प्रचार आला आहे. पण आपल्या बोलण्यात सर्रास वापरला जाणारा 'इंगा दाखवणे' हा वाक्प्रचार नाही. 'अंधार' या शब्दाची नोंद नसताना 'अंधाराने मी म्हणणे' या वाक्प्रचाराचीच नोंद आहे. वास्तविक 'मी म्हणणे' हा वाक्प्रचार आहे. महागाई, ऊन, अंधार अशा कोणत्याही गोष्टीचे आधिक्य दर्शवण्यासाठी हा वाक्प्रचार वापरला जातो. पण असा खुलासा नसल्याने विनाकारण हा वाक्प्रचार 'अंधाराने मी म्हणणे' एवढ्यापुरता सीमित झाला आहे. 'गाढवाचा नांगर फिरणे' या वाक्प्रचाराच्या अर्थस्पष्टीकरणातही असाच अर्थ संकोच झाला आहे. 'सूडबुद्धीने व अपमानास्पद रीतीने इमारत समूळ नष्ट करणे' असा अर्थ या कोशात आढळतो. 'इमारत' ऐवजी गाव, वस्ती अशा एखाद्या शब्दाची योजना असायला हवी होती. 'तुंबडी' या नोंदीपुढे 'तुंबडी भरणे' हा वाक्प्रचार दिलेला आहे. तसाच 'रिकामा न्हावी भिंतीला तुंबड्या लावी' हा 'तुंबडी' चा 'वेगळा अर्थ असलेला वाक्प्रचारही द्यायला हवा होता.

६) 'कटू' या शब्दाचे तिखट आणि कडू हे दोन्ही अर्थ एका पाठोपाठ दिले असले तरी या भिन्न अर्थांचे स्पष्टीकरण दिलेले नाही. संस्कृतमध्ये कटू या शब्दाचा अर्थ तिखट असा होतो आणि मराठीत कडू होतो हा खुलासा करायला हवा.

नपुंसकलिंग या संज्ञेची नोंद या कोशात आहे. पण स्त्रीलिंग, पुल्लिंग या नोंदी नाहीत. नपुंसकलिंग हा शब्द व्याकरणिक अर्थाचा असल्याची सूचना कंसात असली तरी अर्थ देताना सजीव सृष्टीतील लिंगव्यवस्था आणि व्याकरिणक वर्गवारीतील एक कोटी यांच्यात गल्लत केलेली आहे.

अष्ट महासिद्धींची यादी या कोशात दोन ठिकाणी येते. (पृ. ५ व १९०) या दोन याद्यांमध्ये किंचित तफावत आहे.

७) 'मूलद्रव्ये व संज्ञा' यांच्या परिशिष्टात (परिशिष्ट ३, पृ. २०९) 'मराठी नाव' या स्तंभात ऑक्सिजन, नायट्रोजन, कार्बन यांच्यापुढे कोरी जागा सोडल्यामुळे या शब्दांना मराठीत विशिष्ट नाव नाही असा ग्रह होतो. तिथे प्राणवायू, नत्र, कर्ब हे पर्यायी मराठी शब्द दिलेले नाहीत. पण खुद्द कोशात प्राणवायू, नत्र या नोंदी आहेत व इंग्रजी पर्यायी संज्ञाही आहेत.

८) शेवटचा एक मुद्दा. अशा प्रकारच्या कोशामध्ये शब्दांना पर्यायी शब्द, स्पष्टीकरणे दिलेली असतात. या नोंदीच्या उजवीकडील भागातले प्रतिशब्द, (अर्थ समजण्याच्या

दृष्टीने महत्त्वाचे असलेले) कोशात नोंद म्हणून आलेले असावेत अशी अपेक्षा असते. तसे नसेल तर काही शब्दांचे अर्थ समजण्यात अडचण निर्माण होते. उदाहरणार्थ, 'पाभर' या शब्दाचा अर्थ 'औत' असा दिलेला आहे. 'औत' शब्दाची स्वतंत्र नोंद नाही तसेच 'पाभर' चे रेखाचित्रही नाही. 'शिरकाण' चा अर्थ सत्यानाश, नायनाट असा दिलेला आहे. पण 'सत्यानाश' या शब्दाची नोंद नाही. 'लोक' या शब्दाला जे वेगवेगळे अर्थ आहेत त्या अर्थांमध्ये परलोक, इहलोक या शब्दांमधल्या 'लोक'च्या वेगळ्या अर्थाची दखल घेतलेली नाही. पण इतरत्र वेगळ्याच संदर्भातील अर्थस्पष्टीकरणात इहलोक, पारलौकिक हे शब्द मात्र येतात. शिल्पकार, लेणी हे शब्दही भिन्न संदर्भात शब्दांचे अर्थ देताना येतात पण नोंद म्हणून हे शब्द या कोशात नाहीत. या उलट उदाहरण द्यायचे झाल्यास याच कोशातील 'खेचर' आणि 'संकर' या शब्दांचे देता येईल. 'खेचर' चा अर्थ 'घोडा व गाढव यांचे संकर' असा दिलेला आहे आणि 'संकर' या शब्दाचीही वेगळी नोंद आहे. परस्परपूरक नोंदीचे हे चांगले उदाहरण या कोशात आहे.

या कोशाचे संपादक वसंत आबाजी डहाके व गिरीश पतके आणि सहायक अशोक सोलनकर व अनिता जोशी यांनी केलेल्या जाणीवपूर्वक प्रयत्नांमागची तळमळ लक्षात आली म्हणूनच हे उणीव-दिग्दर्शन या परीक्षणात केले आहे.

'आम्हां घरीं धन शब्दाचींच रत्नें । शब्दांचीच शस्त्रे यत्न करू ॥१॥
शब्दचि आमच्या जीवाचे जीवन । शब्दे वाटूं धन जनलोकां ॥२॥
तुका म्हणे पाहा शब्दचि हा देव । शब्देंचि गौरवपूजा करूं ॥३॥

ही तुकारामाची उक्ती या कोशाच्या आरंभीच्या पृष्ठावरच उद्धृत केली आहे. शब्दाविषयीचा हा भाव जागृत करण्याचा हा कोशरूप प्रयत्न स्वागतार्ह आहे.

□□□

**सुप्रिया, ६१/१४ एरंडवन**
**प्राप्तिकर सदनाजवळ, पुणे-४११००४**

# मराठी अभ्यास परिषद आणि 'भाषा आणि जीवन' पत्रिका : एक स्थित्यंतर

मराठी अभ्यास परिषद १९८२ साली अस्थायी स्वरूपात स्थापन झाली आणि १९९५ साली तिची रीतसर नोंदणी करण्यात येऊन ती कायदेशीर स्वरूपात अस्तित्वात आली. (संस्था नोंदणी क्रमांक महा/१०७२१-९५/पुणे, न्यास नोंदणी क्रमांक एफ्.११४५८/पुणे) इकडे परिषदेने १९८३ साली 'मराठी अभ्यास परिषद पत्रिका : भाषा आणि जीवन' सुरू केली आणि पत्रिकेची वृत्तपत्र निबंधक, भारत सरकार, नयी दिल्ली यांच्याकडे नोंदणी करण्यात आली. (नोंदणी क्रमांक ०४००४८/८३). या नवीन परिस्थितीची १०:०९:१९९७ रोजी परिषदेच्या कार्यकारिणीमध्ये विस्ताराने चर्चा झाली आणि २१:०९:१९९७ रोजी झालेल्या संस्थेच्या साधारण सभेत अध्यक्षांनी मांडलेल्या ठरावानुसार एक नवीन व्यवस्था संमत करण्यात आली.

नवीन व्यवस्था करताना काही गोष्ट लक्षात घेतल्या आहेत : (क) १९९१ पासून परिषदेचे आजीव सभासद नोंदण्याचे काम बंद केले होते, मात्र पत्रिकेचे आजीव वर्गणीदार चालू ठेवले होते. (ख) गेल्या काही वर्षात कागद, छपाई, पोस्टेज यांची अतोनात महागाई झाली आहे आणि यापुढे ती वाढत राहील असे दिसते. त्यामुळे पत्रिकेसाठी आजीव वर्गणी स्वीकारण्याचेही १९९८ पासून बंद करावे लागणार आहे. (ग) आपण केवळ परिषदेचे सभासद व्हायचे किंवा पत्रिकेचे वर्गणीदार व्हायचे किंवा दोन्ही व्हायचे याचा स्पष्ट निर्णय यापुढे ज्याला त्याला करायचा आहे. पण आतापर्यंत झालेले सभासद आणि वर्गणीदार यांच्या संबंधात संक्रमणकाळासाठी विशेष तरतुदी करणे योग्य होईल. (घ) परिषदेचे पत्रिका प्रकाशनाखेरीज इतरही उपक्रम असतात, उदाहरणार्थ, महाबँक मराठी भाषाविषयक लेखन पारितोषिक प्रतिवर्षी द्यायचे, चर्चासत्रे घडवायची इत्यादी.

पैशाच्या अडचणीमुळे आजकाल मराठीमधील वैचारिक स्वरूपाची नियतकालिके बंद पडत आहेत. आपल्यापुढील प्रश्नाचे गांभीर्य सांगायला नको. परिस्थितीमधून काही मध्यम मार्ग काढावा या बुद्धीने प्रस्तुत संक्रमणकालीन तरतुद

करण्यात आल्या आहेत त्या संबंधितांनी लक्षात घ्याव्या आणि आवश्यक सहकार्य करावे ही विनंती.

१) संस्थेची रीतसर नोंदणी १९९५ साली झाली आणि संस्थेची नवीन व्यवस्था ०१:०१:१९९८ पासून अमलात येत आहे.

२) १९९८ पासून परिषदेचे सभासदत्व आणि पत्रिकेचा वर्गणीदार असणे याची फारकत करण्यात येत आहे. ज्यांना १९९८ पासून परिषदेचे नव्याने सभासद व्हायचे आहे त्यांनी सभासदत्वाचे वार्षिक शुल्क रु. १०० किंवा यापुढे, वेळोवेळी ठरेल ती रक्कम भरावी. त्यांना घटनेनुसार मिळणारे केवळ सभासदत्वाचे हक्क असतील. त्यांना पत्रिका हवी असेल तर वेळोवेळी लागू असणाऱ्या दराप्रमाणे त्यांना पत्रिकेची वर्गणी वेगळी भरावी लागेल. ज्यांना केवळ पत्रिकेची वर्गणी भरायची आहे ती त्यांनी वेळोवेळी लागू असणाऱ्या दराप्रमाणे भरावी. अशा वर्गणीदारांना परिषदेचे सभासद समजण्यात येणार नाही आणि घटनेप्रमाणे मिळणारे सभासदत्वाचे हक्क असणार नाहीत. पत्रिकेची आजीव वर्गणी स्वीकारण्याची पद्धत यापुढे बंद करण्यात येत आहे.

३) संस्थेची स्थापना १९८२ साली झाली आणि १९९० पर्यंत संस्थेच्या आजीव सभासदांची नोंदणी करण्यात आलेली आहे. या काळात संस्थेचे जे आजीव सभासद झाले आहेत त्यांना नोंदणीकृत परिषदेचे आजीव सभासद मानण्यात येईल. मात्र त्यांची सभासदसूचीत नोंद व्हावी यासाठी ३१:१२:१९९७ पर्यंत विहित नमुन्याप्रमाणे आवेदनपत्र भरून तांत्रिक पूर्तता करणे आवश्यक आहे. ह्या सभासदांनी त्यावेळी भरलेले आजीव सभासद शुल्क रु. २०० किंवा रु. ४०० आणि सध्याची आजीव वर्गणी रु. ६०० यातील फरक देणगी म्हणून द्यावा असे त्यांना नैतिक आवाहन करण्यात येत आहे. (नाहीपेक्षा पत्रिका पाठवीत राहण्यासाठी संस्थेला पडणारी वार्षिक धस वाढत जाईल हे लक्षात घ्यावे.)

४) १९९१ ते १९९७ या काळात 'मराठी अभ्यास परिषद पत्रिके'ची आजीव वर्गणी म्हणून रु. ४०० किंवा रु. ६०० भरणाऱ्यांच्या बाबतीत पुढील तरतुदी लागू करण्यात येत आहेत.

अ) त्यांच्यापैकी ज्यांना नोंदणीकृत परिषदेचे आजीव सभासद होण्याची इच्छा असेल त्यांना ३१:१२:१९९७ पर्यंत रीतसर आवेदनपत्र भरून संस्थेचे आजीव सभासद व्हावे लागेल. मात्र त्यांच्यापैकी ज्यांनी रु. ४०० आजीव वर्गणी म्हणून भरले आहेत

त्यांनी आवेदनपत्रासोबत रु. २०० भरणे आवश्यक आहे. ज्यांनी अगोदरच रु. ६०० भरलेले आहेत त्यांनी फक्त आवेदनपत्र भरणे आवश्यक आहे.

आ) परिच्छेद 'अ' मधील तरतुदीनुसार जे पत्रिकेचे आजीव वर्गणीदार नोंदणीकृत संस्थेचे नव्याने आजीव सभासद होतील त्यांनाच घटनेप्रमाणे मिळणारे आजीव सभासदत्वाचे हक्क मिळतील. नाहीपेक्षा ते सध्या आहेत त्याप्रमाणे केवळ पत्रिकेचे आजीव वर्गणीदार राहतील.

५) १९९५ साली जे मराठी अभ्यास परिषदेचे वार्षिक वर्गणीदार झाले आणि अजूनही आहेत. त्यांना आणि १९९६ व १९९७ साली जे लोक पुण्यातून पत्रिकेचे वार्षिक वर्गणीदार झालेले आहेत त्यांना साधारण सभेसाठी निमंत्रित करण्यात आले होते. जरी १९९१ पासून परिषदेची आजीव सभासद नोंदणी थांबवण्यात आली होती तरी संक्रमणकाळातील विशेष तरतूद म्हणून त्यांना ३१:१२:१९९७ पर्यंत नोंदणीकृत संस्थेचे आजीव सभासद होऊन जाण्याची संधी देण्यात येत आहे. त्यासाठी त्यांनी ३१:१२:१९९७ पर्यंत आवेदनपत्र आणि रु. ६०० आजीव सभासद शुल्क भरायचे आहे.

६) वरील तरतुदींनुसार ३१:१२:१९९७ पर्यंत जे नोंदणीकृत संस्थेचे आजीव सभासद ठरतील किंवा होतील त्यांना 'मराठी अभ्यास परिषद पत्रिके' ची वेगळी वर्गणी भरावी लागणार नाही.



---

- ☐ मराठीत विरोधाभास हा शब्द विरोध या अर्थाने भल्याभल्यांच्या वापरात येतो. असं का व्हावं? विरोध आणि विरोधाचा आभास यात फरक का उरू नये?

- ☐ प्रकाश, तक्रार, भ्रष्ट वगैरे शब्दांमध्ये र चा उच्चार दाखवण्यासाठी अनुक्रमे प, क, भ वगैरे अक्षरांच्या पोटातून डावीकडे तिरकी रेषा आपण काढतो तिला काय म्हणायचं? रफारच?

**शर्मिष्ठा खेर**
**सी ३ कलाबसंत सहनिवास**
**काशीनाथशास्त्री अभ्यंकर पथ, पुणे ४११००४**

**पैसे भरण्याबद्दल सूचना :**

पैसे रोख दिल्यास आठवणीने पावती घ्यावी. चेक 'मराठी अभ्यास परिषद' या नावाने काढावा. मनिऑर्डरकूपनवर किंवा चेकसबोतच्या चिठ्ठीवर पैसे पाठवणाराचे नाव, पत्ता, रक्कम आणि ती कशा पोटी पाठवली. ते अवश्य लिहावे. नमुना अंक मिळाला असल्यास कोणता मिळाला, याचा उल्लेख करावा. चेक बँकेच्या पुण्याबाहेरच्या शाखेचा असल्यास रकमेत ५ रुपये वटणावळ भर घालावी. पावती मागाहून पाठविली जाईल.

**पत्रिकेची वर्गणी :**

पत्रिकेची वार्षिक वर्गणी भरताना पत्रिकेचे वर्ष जानेवारी ते डिसेंबर असेच राहील हे लक्षात घ्यावे. पत्रिकेचे वर्षात चार अंक निघतात. मात्र १९८३ मध्ये केवळ दोनच अंक निघाले आहेत. पत्रिकेचे चालू वर्षाव्यतिरिक्तचे अंक हवे असल्यास मिळू शकतील. वर्गणीची आकारणी पुढीलप्रमाणे करण्यात येते :

- चालू वर्गणी परिषदेच्या सामान्य सभासदांसाठी (सभासद वर्गणी धरून) वर्षाला ६० रु.
- चालू वर्गणी संस्था आणि सभासद नसलेल्या व्यक्ती यासाठी वर्षाला ७५ रु.
- सुट्या अंकाला (मग तो चालू वर्षाचा असो, की मागील यापैकी असो)२०रु.
- परदेशातील संस्थांसाठी वर्षाला २० डॉलर.
- सुटा अंक परदेशी पाठवायचा झाल्यास त्याची किंमत ६ डॉलर इतकी पडेल.

**परिषदेची वर्गणी :**

सामान्य सभासदांची वार्षिक वर्गणी वर दिलीच आहे. एका घरात एकापेक्षा अधिक सामान्य सभासद असले आणि त्यापैकी एकाच्याच नावावर पत्रिकेचा अंक हवा असला तर इतर सभासदांनी केवळ ३० रु. भरायचे आहेत. उदाहरणार्थ : एका घरात दोन सभासद आणि एक अंक अशी स्थिती असल्यास वर्षाला ६० रु. + ३० रु. असे एकूण ९० रु. भरावे लागतील.

**जाहिरातीसाठी दर :**

पूर्ण पान ७५० रु., अर्धे पान ४०० रु. पाव पान २५० रु., शुभेच्छा सूचना १०० रु., आवरण पृष्ठ चार १००० रु., आवरण पृष्ठ दोन/तीन ८०० रु. जाहिरात हिंदीत वा इंग्रजीत असल्यास चालेल, मराठीत असल्यास उत्तम.